॥ श्री ॥

सचित्र व संगीत

# हुंडा नाटक

[अंक १ ते ४]



लेखक : कै. गणपतराव सोकरजी त्रिलोकेकर.

ह्या पुस्तकास पुण्याच्या दक्षिणा प्राईझ कामिटीने बक्षिस दिलें आहे.
व बडोद्याच्या श्रीमंत गायकवाड स्टेटनें आपल्या लायब्ररीकरितां
हें पुस्तक मंजुर केले आहे.

---

प्रकाशकः—आयडिअल आर्टिस्टस्.

किंमत १ रुपया.

आवृत्ति २ री.



ता. २६ आक्टोबर. १९४०.

प्रकाशक,
**रामदत्त गणपतराव अजिंक्य.**
आयडियल आर्टिस्ट
१८८, बी, भिमराव वाडी,
गिरगांव. मुंबई ४.

मुद्रक
**कृष्णाजी नारायण सापळे**
रामकृष्ण प्रिं. प्रेस,
जुडेक्स बिल्डिंग, त्रिभुवन रोड,
मुंबई नं. ४.

# प्रकाशकांचे दोन शब्द

कै० गणपतराव सोकर बापूजी त्रिलोकेकर कृत " हुंडा " नाटकाच्या **दुसऱ्या आवृत्तीचे** प्रकाशक या नात्यानें दोन शब्द लिहिणें जरूरीचें आहे. " आयडियल आर्टिस्टस् " या पंचप्राणरूपी संस्थेचें हें दुसरें प्रकाशन वाचकांस सादर करीत असतांना आह्मांस आनंद वाटत आहे. तो आनंद ही कृति पाहून खूप झालेल्या वाचकांच्या तोंडचे गोड उसासे ऐकून द्विगुणित झाल्या-शिवाय राहाणार नाहीं.

परंतु या सर्व आनंदाचें श्रेय **पाठारे प्रभु नर्सिंग असोसिएशनला** व विशेषतः त्या संस्थेच्या उत्साही चिटणीसांना म्हणजेच पोलीस प्रॉसिक्यूटर चंद्रकांत बालमुकुंद वेलकर यांना दिलें पाहिजे. बरेच जुने झाल्यामुळें विसर-ण्याच्या पंथास लागलेलें नाटक आपल्या संस्थेच्या रौप्य महोत्सव समारंभाच्या वेळीं रंगभूमीवर आणविण्याचा प्रयत्न व त्याजबरोबर त्या नाटकाच्या द्वितीय प्रकाशनाची संधि आम्हांला देऊन जी कांहीं जनसेवा त्यांच्याकडून झाली आहे ती वाखाणण्यासारखीच आहे. हुंड्याची चाल पाठारे प्रभु ज्ञातींतच नव्हे तर इतरत्रहि फार पूर्वीपासून प्रचलीत आहे. मध्यंतरी ती बंद पडत चालली होती. पण आज जरी उघडपणें नसली तरी प्रच्छन्नपणें थोड्या अधिक प्रमाणांत चालू आहेच. ह्या रूढीमुळें निरनिराळ्या कुटुंबांची कुचंबणा आजही कशी होत आहे हें पुन्हां एकदां ज्ञातिजनार्दनास दाखवून द्यावें व त्याजबरोबर जुन्याचें पुनर्जीवन करावें अशा हेतूनें हें नाटक चित्तरंजन नाट्यसमाजाकडून रंगभूमीवर आणावयाची कल्पना फारच उद्बोधक दिसते. परंतु नुसत्या अभिनयानें कल्पना येणार नाहीं. पण तीच वाचनानें जास्त सुलभ होईल या आशेनें व सध्यां पहिल्या आवृतीच्या प्रति वाचकांना वाचावयास सांपडत नसल्यामुळें या मंगल-समयीं त्याच नाटकाच्या द्वितीय प्रकाशनाची सुंदर कल्पना त्यांनीं आम्हांला सुचविली व त्याकरितां लागणारी मदत, वेळांत वेळ काढून, आम्हांला केली. त्याबद्दल श्री. वेलकरांचे आम्हीं फार ऋणी आहोंत.

तसेंच या पुस्तकाच्या द्वितीय प्रकाशनाचे हक्क आम्हांस दिल्याबद्दल सध्यां या नाटकाचे हक्क स्वाधीन असलेले नाटककारांचे चिरंजीव श्री. रामराव गणपतराव त्रिलोकेकर यांचे आम्हीं आभार मानावयास हवेत. कारण हल्लीच्या

युद्धकालीन महागाईत पुस्तकाच्या प्रकाशनाचें काम त्यांनीं, कांहीही मोबदला न घेतां, अतिशयच सुलभ करून दिलें

या प्रकाशनाचें नाविन्य म्हटलें म्हणजे गद्य नाटकाचे साग्रसंगीत नाटकांत रूपांतर हें होय. तेवढ्याकरितां लागणारी पद्यें निरनिराळ्या सद्‌गृहस्थानीं आम्हांस दिली आहेत त्याबद्दल त्यांचे आभार मानले पाहिजेत, सुरवातीचें पार्टीचे गाणे " सांगा सगळयांना " श्री. नारायण रघुनाथ त्रिलोकेकर यानीं रचिलें, दुसरें " प्रियकर नाथा सवतीस सोडा " हें पद कविवर्य रामराव बाळकृष्ण कीर्तिकर यानीं सजविलें आणि बाकी सर्व पद्यरचना श्री. सुंदर भुजंगराव मानकर यांनी केली. त्या सर्वांचें आम्ही आभारी आहोत.

त्याचप्रमाणें प्रकाशन सुबक होण्यास आणखी भर पडली ती म्हणजे नाटकांतील कांहीं प्रसंगाची छायाचित्रें घातल्यामुळें. प्रथमावृत्तींत केवळ ठराविक प्रसंगाची रेखाचित्रें होतीं तर यांत सध्यां करीत असलेल्या चित्तरंजन नाट्यसामाजाच्या नटांनीं दिलेल्या अभिनय कुशल प्रसंगाचे देखावे उत्तम सजावटींत छापले आहेत. हे सर्व प्रसंग निवडून योग्य ते देखावे रचण्यांस मदत केल्याबद्दल श्री. विठोबा झावबा हे कारणीभूत असल्यामुळें त्यांचे आभार आवश्य मानले पाहिजेत. तसेंच त्या देखाव्याच्या सुंदर छायाचित्रांचें थोडक्या वेळांत सुबक ब्लॉक्स करून दिल्याबद्दल डी. बी. नेरॉय कंपनीचे देखील आभार मानणे योग्यच ठरेल.

आणि सर्वांच्या शेवटीं पण महत्त्वाचे आभार मानावयाचे ते रामकृष्ण प्रिंटिंग प्रेसचे संचालक श्री. के. एन्. सापळे यांचे. कारण दिपावलीच्या वेळीं खास अंकांच्या गडबडींत देखील अगदीं अल्पावधींत इतकी सुंदर छपाई त्यांनीं करून दिली आहे ती अवर्णनीय ठरेल. तसेंच इतर मित्रमंडळी, कीं ज्यानीं आम्हाला ह्या पुस्तकाच्या प्रकाशनाचे बाबतींत मदत केली त्या सर्वांचे आभार मानून हे दोन शब्द पुरे करतों.

ता. २६।१०।४० —यडिअल आर्टिस्टस्

|| श्री ||

# प्रस्तावना.

---

श्लोक—( शार्दूलविक्रीडित )

पाठारेप्रभुकन्यका उपवरा ऐशा गणाव्या किती ॥
दुर्दैवी धनहीन आत्मजनकां चिंतानलीं लोटिती ॥
हृद्रोगें झुरती अशा तरि किती जाती स्वधामाप्रती ॥
हुंड्याचा परिणाम दुष्ट किति हा ज्ञाते कसे नेणती ॥

( सो० बा० त्रि० )

संसारिक अथवा सामाजिक नाटकें ज्यांस इंग्रजींत 'सोशियल प्लेज' म्हणतात अशीं नाटकें पाश्चिमात्य लोकांत पुष्कळ वर्षांपासून प्रचारांत आहेत, व त्यांचा खरा गुण व उपयोग त्यांस पूर्णपणें अवगत आहे. एखाद्या समाजांतील गुण-दोषांचें हुबेहुब चित्र वाचकांच्या अथवा प्रेक्षकांच्या मनावर उत्तम रीतीनें ठसा उमटेल अशा प्रकारें रेखण्यास संसारिक नाटकासारखा दुसरा सुलभ व खातरी-लायक मार्ग नाहीं हें निर्विवाद आहे. शेरिडन, गोल्डस्मिथ वगैरे प्रख्यात आंग्ल-नाटककारांनीं व मोलियर वगैरे फ्रेंच नाटककारांनीं लिहून ठेविलेली नाटकें या गोष्टीची प्रत्यक्ष साक्ष देत आहेत.

वरील प्रकार आपणांस माहित असून व नाट्यकला आपल्या लोकांत आज बरींच वर्षें प्रचारांत असून, आपल्या लोकांत अशा तऱ्हेचीं नाटकें फारच थोडीं झालीं आहेत ही एक अति आश्चर्याची गोष्ट नव्हे काय! परंतु त्यांत आश्चर्य कशाचें! सुधारणेच्या इतर बाबतींत ज्याप्रमाणें आपलें पाऊल पाठीमागें त्या-प्रमाणें याहि बाबतींत तें तसें असावें यांत नवल काय? शिवाय, लोकांस संगीत नाटकांचा नाद लागल्यापासून सामाजिक नाटकें—जी वास्तविक गद्यात्मकच असलीं पाहिजेत—त्यांकडे दुर्लक्ष्य होणें हें साहजिकच नव्हे काय? असो.

अशा प्रकारचें एखादें नाटक रचावें असें मला वाटल्यावरून परक्या समाजापेक्षां स्वताचा समाज जास्त परिचयाचा व निकट संबंधाचा असल्यामुळें त्यांतच विषयशोधनार्थ पाहूं लागलों. या सुमारास आपल्या जातींत हुंड्याचें बरेंच बंड माजलें होतें ( तें अद्यापिहि तसेंच जारीनें चालू आहे ). या स्थितीचें हुबेहुब वर्णन आमच्या तीर्थरूपांनीं रचून दिलेल्या व प्रस्तावनेच्या सुरवातींत छापलेल्या फक्त एका श्लोकांतच चटकदार रीतीनें येऊन गेलें आहे. तर अशा अनिष्टपरिणामी चालीपासून होणाऱ्या अनर्थाचें चित्र यथामति आपल्या ज्ञातिबांधवांपुढें नाटकरूपानें ठेवण्याच्या हेतूनें मीं प्रस्तुतचें नाटक रचिलें. पुढें त्या नाटकाचे प्रयोग **'धी प्रभु ॲमेच्युअर्स'** नामक मंडळीनें आपल्या ज्ञातींतील सरळ व शुद्ध मनाचे निःस्पृह व नाट्यकलाप्रवीण **रा. रा. बाळकृष्ण वासुदेव नारायण कीर्तिकर** व इतर नाट्यकलामर्मज्ञ गृहस्थांच्या देखरेखीखालीं सन १८९५ सालीं मुंबईत गेइटी थिएटरांत करून दाखविले. ही मंडळी सुशिक्षित व विद्वान् असल्यामुळें ते प्रयोग इतके उत्तम वठले कीं पुन्हा त्या नाटकाचे प्रयोग करून दाखविण्याच्या अनेक सूचना मंडळीस आल्या; परंतु कांहीं अपरिहार्य अडचणीमुळें तसा योग घडून आला नाहीं.

वरील नाट्यप्रयोग झाल्यानंतर या नाटकाविषयीं अनुकूल व सविस्तर असा अभिप्राय त्या वेळच्या 'मुंबई वैभवा'मध्यें आला होता. तसेंच जिकडून तिकडून पुस्तक छापवून प्रसिद्ध करण्याच्या शिफारसी होऊं लागल्या; परंतु अनेक अडचणीमुळें पुस्तक छापणेंहि तसेंच राहिलें. इतक्यांत, आपल्या ज्ञातींतील प्रसिद्ध मराठी कवि, काव्यमर्मज्ञ **डॉ. कान्होबा रणछोड कीर्तिकर** यांनीं या नाटकाची हस्तलिखित प्रत रत्नागिरीस मागवून नेली व ती प्रत परत पाठवितांना त्यांनीं फारच अनुकूल अभिप्राय प्रदर्शित करून अशा प्रकारची आणखीं नाटकें लिहिण्याची शिफारस केली. त्यामुळें मला बरेंच उत्तेजन येऊन मी हें नाटक छापवून प्रसिद्ध करण्याचें धाडस केलें आहे. प्रयत्न पहिलाच आहे. व अशा तऱ्हेचा ग्रंथ आजपर्यंत आपल्या ज्ञातिबांधवापैकीं कोणीहि लिहिलेला नाहीं. सबब माझी ही कृति सर्वांस कितपत मान्य होईल तें माझ्यानें सांगवत नाहीं. तथापि मला एवढें ह्मटल्याशिवाय रहावत नाहीं कीं जे कोणी निःपक्षपातानें व शुद्ध मनाने हा ग्रंथ वाचतील त्यांस त्यांत वावगें असें कांहींच आढळणार नाहीं असा माझा समज आहे. असो.

वरील '**प्रभु ॲमेच्युअर्स**' ज्यांनीं माझें नाटक रंगभूमीवर उत्तम रीतीनें आणून माझ्या कृतीचें चीज केलें त्याबद्दल मी त्या सर्वांचा फार आभारी आहें. त्याचप्रमाणें माझे तीर्थरूप **रा. रा. सोकर बापूजी त्रिलोकेकर** ज्यांनीं मला हें नाटक लिहिते वेळीं अति उपयोगी अशा अनेक सूचना केल्या व खरोखरींच ज्यांच्या आशीर्वादाचें हें सर्व फळ आहे, त्यांचाहि मी फार ऋणी आहें.

मुंबई
ता. ७–१०–१९०४. } **गणपतराव सोकरजी त्रिलोकेकर**

---

॥ **श्री राम प्रसन्न** ॥

**चित्तरंजन नाट्य समाजानें** पा. प्र. नर्सिंग ॲसोसिएशनच्या रौप्य महोत्सवा प्रीत्यर्थ " **हुंडा** " नाटकाचा संगीत स्वरूपांत प्रथम प्रयोग शनिवार ता. २६ आक्टोबर १९४० रोजीं दुपारीं ३ वाजतां बालीवाला ग्रँड थिएटर, मुंबई, येथें करून दाखविला. सदर प्रयोगांतील भूमिका वठविण्यांत खाली नांवें दिलेल्या मंडळींनीं भाग घेतला.

| | |
|---|---|
| **खंडेराव ( दादाजी )** | श्री. विठोबा झावबा |
| **सोनाबाई ( दादीबाई )** | ,, नारायण मानकर |
| **सुंदरराव** | ,, हिरामण देसाई |
| **काशीबाई** | ,, श्रीवल्लभ बापट |
| **शामराव** | ,, चुनीलाल धुरंधर |
| **बेनाबाई** | ,, विजयसेन सेंजित |
| **विश्वासराव** | ,, विनायक झावबा |
| **वामनराव** | ,, चंद्रसेन नवलकर |
| **पुतळाबाई** | ,, शरद्चंद्र पोवळे |
| **धाकलाभाई** | ,, शंकर झावबा |
| **बाळा** | मास्टर नारायण झावबा |
| **मारवाडी** | श्री. मोरेश्वर कोठारे |
| **रामराव** | ,, यशवंत जयकर |
| **पो. इन्स्पेक्टर** | ,, दयाराम वरवटकर |
| **रंगी ( नायकीण )** | ,, राजाराम बोरूलकर |
| **भगवानदास** | ,, गजानन चौबळ |
| **मंगेश** | ,, नारायण धैर्यवान |

बाळंभट, नरहरभट, व्यंकय्या, रामा, गोविंदा, चिंतोपंत भैय्या, कासम, गाडीवाला, शिपाई वगैरे, वगैरे.

---

# हुंडा नाटक

## अंक १ ला

### प्रवेश १ ला

ईशस्तवन

**हे प्रभो विभो अघोर किती ही करणी ॥ धृ ॥**
**हुंडाहि भयंकर मोठा । थोरांसहि लाविल घोरा ।**
**लग्नाचा कडवट ऐसा । देसी अनुभव कैसा ॥ १ ॥**
**हुंड्याविण लग्न कराया । सज्ज तया मिळत न जाया ।**
**जाति बिचारे फुकटचि वायां । अतर्क्य अशी**
**तव माया । निर्दया ॥ २ ॥**

[ **स्थळ**—मुंबई–पोपटवाडींतील घर.] [पात्रें–**सुंदरराव व काशीबाई.**]

[काशीबाई खोलींत लोकरीचें काम करीत बसली आहे. सुंदरराव बाहेरून येतो.]

**सुंदरराव**—( कपडे काढीत असतां ) नको हा संसार! संसारांत राहून जर चार घटका सुख नाहीं तर काय उपयोग!

**काशीबाई**—( वर मान करून हंसत ) कां? संसाराचा कंटाळा यायला इतकं झालं तरी काय? ज्या कामास जायाचं झालं होतं तें काम झालं नाहीं वाटतं?

**सुं०**—कसचं काम घेऊन बसली आहेस! तुला खरोखर सांगतों आपल्या बेनूस तशीच अविवाहित ठेवलेली पतकरली पण तें लोकांचें आर्जव करणें नको! मघां त्या कृष्णंभटानें सांगितल्याप्रमाणें खंडेरावाकडे गेलों होतों. मुलगी वगैरे सर्व कांहीं पसंत झालें पण दोन शेर सोन्याशिवाय ते मुलगी करीत नाहींत.

**का०**—अगबाई! इतकं सोनं कोठून द्यावयाचं तरी!

**सुं०**—तूंच पहा तरी. काय आमच्या लोकांनीं अवदसा घेतली आहे ही! जो उठला तो दोन तीन शेर सोनें व शिवाय रीत मागतो! एवढें आणावें कुठून? माझ्यासारख्या गरीबाजवळ एवढी रीत करण्यास पैसे कोठून येणार! काय आमच्या वाडवडिलांनीं धनदौलत ठेविली आहे कीं त्यांतून आम्हीं त्यांस द्यावें! आणखी त्यांत एकादी मुलगी असती तर पतकरतें! हो, कशीतरी तजवीज केली असती. परंतु या मला दोन मुली आहेत. मोठी तर सतरा वर्षांची झाली. तिच्या खालची चौदापंधरा वर्षांची असेल. कशी हं हं म्हणतां वाढली! मुलींना

वाढायला वेळ नाहीं लागत ! आतां माझ्यासारख्यानें प्रत्येक मुलगीच्या पाठीमागें एवढी रीत करावी तरी कोठून !

**का०**—तें सगळं खरं, पण करणार काय ? आपल्या जातीमध्यें दुसऱ्या जातीसारखे पंच थोडेच आहेत, कीं त्यांच्या कानांवर गोष्ट घातली असतां आपल्यासारख्या गरीबांची दाद लागेल.

**सुं०**—खरोखर तसला कांहीं प्रतिबंध असता तर फार चांगलें झालें असते ! पण अशी जर आमच्या जातींत एकी असती तर तिची इतकी वाईट स्थिति कां झाली असती ? स्वतांच्या जातीविषयीं अभिमान न बाळगणारे असे आमचे लोक जितके सांपडतील तितके इतर कोणत्याही ज्ञातींत सांपडणार नाहींत. आपलें तेवढें झालें म्हणजे झालें, मग दुसऱ्याचें कांहीं कां होईना ! याचमुळें ही आमची अशी स्थिति !

**का०**—तें सगळं खरं, पण आपल्या बेनूचा कसा काय विचार ? तिला मग-शिरांत अठरावं वरीस लागेल.

**सुं०**—मला तर अगदीं सुचेनासें झालें आहे. तिचें लग्न नाहीं झालें तों पुतु वाढली आहेच. तिला चौदावें वर्ष चाललें आहे वाटतें ?

**का०**—चौदावं कसं. तिला हें पंधरावं वरीस चाललं आहे. सोळावं पुसांत लागेल.

**सुं०**—घे तर. दोघींचींही लग्नें करणें अवश्य आहे. पण लग्नें करावयाचीं कशीं. येवढा पैसा आणू कोठून ! मला तर वाटतें कीं यांना तशाच वाढूं द्याव्या ! असेल त्यांच्या नशिबीं तर मिळतील त्यांना नवरे ! नाहीं तर रहातील तशाच ! आपण त्यास काय करणार ! त्यांचें नशीब त्यांच्याबरोबर ! आईबाप मुलांस जन्म देतात पण कर्म देत नाहींत. ( इतक्यांत बाळंभट उपाध्ये येतात. )

**बा०**—कसं काय यजमान ठीक आहे ना ?

**सुं**—हं आहे ठीकच म्हणावयाचें.

**का०**—बसा बाळंभटजी [ बाळंभट बसतात ]. पण कांहो बाळंभटजी, तें बेनूचं यादवन घेऊन गेले होतेत त्याचं काय झालं ?

**बा०**—रामरावाकडे ना ? तें घेऊन ठेविलें आहे. पण योग जमेलसा रंग दिसत नाहीं. त्यांनांही मोठी रीत पाहिजे. जिकडे जावें तिकडे दोन शेर तीन शेर सोनें मागतात.

**का०**—बरं ते काय रीत मागतात !

**बा०** —रीत का ? दोन शेर सोनें व पांचशें रुपये रोकड. शिवाय तांब्या चाडगा व मधुपर्काचा पितांबर व चांगली मोठ्या दाण्यांची भिकबाळी !

**सुं०**—वाः वाः आणखी कांहीं नाहीं का ? हो मागायला काय ? उचलली जीभ लावली टाळ्याला ! बाळंभट, तेवढें देण्याची आपणांस शक्ति नाहीं. काय चमत्कार आहे तरी ! कांहो बाळंभट, हा रामराव येवढा ऐवज मागतो तर काय त्याला भीक लागली आहे !

**बा०**—रीत मागणें हें कांहीं भिकारी किंवा श्रीमंत यावर अवलंबून नाहीं. भिकारीही मागतात व श्रीमान्‌ही मागतात. दोघेही एकच !

**सुं०**—या श्रीमान् लोकांचीं पापें आम्हांस नडताहेत हीं ! वाळे तोडे वगैरे देण्याची ही रीत त्यांनींच पाडली. त्यांचें पाहून गरीबही तसेंच करूं लागले !

**का०**—पण बाळंभट, दुसरा नाहीं कां एकादा तुमच्या पहाण्यांतला मुलगा ?

**बा०**—काशीबाई, मुलगे पुष्कळ आहेत. पण उपयोग काय ? तोंच पहाना ठाण्यास तुमचा सदानंद आहे तो. परवां मुंबईस आला होता. त्याच्याकडे एक यादवन घेऊन गेलों होतों.

**का०**—त्याच्या तर सगळ्या मुलांचीं लग्नं झालीं आहेत.

**बा०**—वा ! त्याच्या पहिल्या कीं दुसऱ्या मुलाची पहिलीं बायको नुकतीच वारली नाहीं का ?

**का०**—हं. हं. खरंच. त्याचं लगीन करीत आहे का म्हातारा ?

**बा०**—होय. तेव्हां त्याच्याजवळ एक यादवन घेऊन गेलों होतों. मुलगी आहे तुमच्या सारख्याची. पण म्हातारा किती जबरा पहा ! त्यानें मला चक्क विचारिलें; "भटजी तुमचा यजमान दोन शेर सोनें देण्यासारखा आहे का ? तसें असेल तर पुढें मग यादवनाविषयीं विचार !" मीं त्याला सांगितलें, "माझा यजमान इतका कांहीं श्रीमान् नाहीं. साधारण चार चौघांसारखी रीतभात करील." हें ऐकतांक्षणीं म्हाताऱ्यानें मला साफ सांगितलें कीं, "तसें आहे तर आलेत तसे चालते व्हा. आमचे मुलगे काय वाटेवर पडले आहेत !"

**का०**—तो म्हातारा तसाच आहे. प्रत्येक मुलाच्या पाठीमागं दोन दोन शेर सोनं घेतलं आहे. अशा रीतीनें त्या म्हाताऱ्यानें आठदहा हजारांचं सोनं घरांत जमविलं आहे.

**सुं॰**—जमवो बापडा ! आणखी जमवो ! पण बाळंभटजी, मी तुम्हांस खरोखर सांगतो असें अडवून धरून पैसे अथवा रीत काढण्यांत मोठें शहाणपण नाहीं, व अशा रीतीनें घेणाऱ्यांस बरकतही नाहीं.

**बा॰**—यांत काय संशय !

**सुं॰**—पण बाळंभट, मुलगा तरी आहे का चांगला ? कीं आपला असाच ?

**बा॰**—हं हं ! तें विचारूंच नका. ज्याप्रमाणें रीत मागणें हें गरीब किंवा श्रीमान् यांवर नाहीं त्याचप्रमाणें हुंड्याचें मान शहाणा किंवा मूर्ख मुलगा यावर नाहीं. किंबहुना उलटच आहे असें म्हटलें तरी चालेल. सध्याच्या मानाप्रमाणें भटके, दारू पिणारे, अक्षरशत्रू अशां मुलांची किंमत तर शहाण्यासुरत्या मुलांपेक्षां देखील जास्त आहे.

**सुं**—हो, असें तर खरेंच, व अंतीं तसेंच होतें. एखाद्या शहाण्या मुलास मोठासा हुंडा देऊन जरी मुलगी दिली तरी तिच्याविषयीं पुढें मग काळजी करायची जरूर पडत नाहीं. कसें तरी आपल्या बायकोचें पोट भरील. पण तशी गोष्ट दुसऱ्यांची नाहीं. त्यांनां रीत द्या, आपली कष्ट करून जिवापलीकडे वाढविलेली मुलगी द्या, व त्यांचा पुढला देखील संसार संभाळा. भटजी तुम्हांला काय सांगूं ! अहो वासकुटें, शर्टें, टोप्या, जोडे, बूट, चहा काफी छत्र्या हेंही त्यांना पुरविलें पाहिजे !

**का॰**—काय करतां. पोटच्या गोळयासाठीं तेंही करावं लागतं.

**बा॰**—हो ! खरोखरच [ घड्याळांत तीन वाजतात. ] ओहो ! तीन वाजले हे ! बरं यजमान, घेतों आतां रजा.

**सुं॰**—या.

**का॰**—बाळंभटजी, मीं सांगितलेली गोष्ट विसरूं नका बरं.

**बा॰**—छे. छे. विसरतों कसा. मी त्याच खटपटींत आहे. मी ह्मणतों एकदां बेनाबाईचं लग्न लावून गांवीं मुलीचं लग्न करावयास जाईन. पाहूं कसं काय साधेल तें खरें. येतोंबरं काशीबाई [ जातो. ]

**का॰**—अगबाई—कशी हं हं ह्मणतां दुपार निघून गेली. चला बाई. संध्याकाळच्या धंद्यास लागावं. [ आंत जाते. ]

**सुं**—आपणही सोशल क्लबांतून जाऊन यावं. तेथें तरी अंमळ दुःखाचा विसर पडेल. [ जातो. ]

---

## प्रवेश २ रा.

( स्थळ—रस्ता. )

[ बाळंभट. ]

**बा०**—( स्वगत )—रामरावांनीं जबाबासाठीं आजच बोलावलें होतें. तेव्हां पहिल्यानें तिकडेच जावें. जबाब काय मिळणार त्याचें भविष्य मीं पूर्वीच करून ठेविलें आहे. त्यांच्या तोलास तोल देणारा व्याही भेटल्याशिवाय तेथें कसचें जुळतें! तेव्हां सुंदररावांच्या मुलीचें यादवन तेथून परत येणारच! पण आतां दुसऱ्या कोणाच्या येथें घेऊन जावें बरें? मी तर अगदीं कंटाळून गेलों बुवा! तीन वर्षें झालीं इकडून तिकडे आणि तिकडून इकडे याप्रमाणें नेतां नेतां तें यादवनही बिचारें फाटून गेलें. परंतु छः एकीकडेही जमत नाहीं! माझ्या ओळखींपैकीं एकही घर राहिलं नाहीं—नाहीं, पण हो, बरी आठवण झाली! विठ्ठलवाडींतल्या खंडेरावांच्या मुलाचं दुसरं लग्न होणार म्हणून ऐकतों खरें! पण तेथें डाळ शिजेल असें मला तर वाटत नाहीं! खंडेरावांजवळ मागें एकदां जाण्याचा प्रसंग आला होता तेव्हांच्या अनुभवावरून माझी पक्की खातरी आहे कीं तेथें कांहीं वळायचं नाहीं—पण प्रयत्न तर करून पाहूं! मुलगाही कांहीं चांगला नाहीं! बिजवर असून ढंग बरेच आहेत! पण त्याची आपणाला कशाला पंचाईत पाहिजे! आपलं काम लग्न जुळवून द्यावयाचं—पुढें कांहीं कां होईना—आपली दक्षणा ताजी झाली म्हणजें झालें—हं—तेथेंच प्रयत्न करून पाहूं—हं बोलतां बोलतां देवळाजवळ आलों-चला तेथेंच जाऊं! नरहरभटजींची भेट घ्यावयाची आहे! चला.

( जातो. )

---

## प्रवेश ३ रा.

( **स्थळ**—झावबाचें देऊळ. )

(कांहीं मंडळी देवाचें दर्शन घेत आहे, कांहीं गप्पा मारीत बसली आहे, इतक्यांत बाळंभट तेथें येतात त्यांस पाहून.)

**गोविंदभट**—नमोनमः नमोनमः बाळंभट आज तुम्ही येथें कोठें?

**बाळंभट**—सहज येथील पुजारी नरहरभटजींना भेटण्यास आलों आहें. आहेत कां नरहरभटजी येथें?

**गो०**—नरहरभटजी का? ते तर आतांच बाहेर गेले. येतील थोड्या वेळानें. पण तुम्ही तर अंमळ बसा. पुष्कळ दिवसांनीं भेट झाली. (बाळंभट बसतात.)

**गो०**—[चंची काढून] पान तर खाल. [पान खातात. इतक्यांत आंतून पांच दहा ब्राह्मण मुगटे व पंचपात्र्या हातांत घेऊन ढेंकर देत येतात व देवळाच्या ओटीवर जातात.)

**बा०**—हे हो कोण?

**गो०**—हे का? अहो हे सदाव्रतांतले ब्राह्मण.

**बा०**—ठीक! नानासाहेबांनीं स्थापिलेल्या सदाव्रतांतले होय? आहा! त्यांच्या आत्म्यास किती सुख होत असेल बरें! सदाव्रतांपेक्षां अधिक पुण्यदायक धर्म कोणता!

**गो०**—सर्व धर्मांत अन्नधर्म उत्तम खरा, परंतु अशा सदाव्रतास मी धर्म मानीत नाहीं.

**बा०**—तें कां बरें?

**गो०**—कारण उघड आहे. अहो बाळंभट, गलेलठ्ठ व आळशी अशांस, मग ते ब्राह्मण असले म्हणून काय झालें—यथेच्छ भोजन देण्यांत पुण्य तें कसलें? अशा धर्मसंस्था एकंदर गांवांतील भिकार वाढविण्यास कारणीभूत होतात—दुसरें कांहीं नाहीं. आपणां दक्षणी लोकांत अशा संस्था फारच थोड्या. परंतु त्या गुजर लोकांत अशा संस्थांचें बरेंच बंड माजलें आहे. एकंदरीनें पाहतां या संस्था स्थापन करण्याचा मूळ हेतू तो एकीकडेसच राहून, एरवीं मोलमजुरी व इतर अंगमेहनतीचीं कामें करून जे आपलीं पोटें भरतात अशा लोकांस आळशी बनवून, एकंदर समजाचें व देशाचेंही अकल्याण करण्यास या संस्था बऱ्याच अंशीं मदत करतात असें म्हटलें असतां अतिशयोक्ति केल्याच्या दोषास मी पात्र होईन असें निदान मला तर वाटत नाहीं. मग तुमचें मत काय असेल तें असो.

**बा०**—अहो गोविंदभट, तुम्ही म्हणतां तसें असेल! आपणांस कशाला उगीच त्याविषयीं वितंडवाद हवा!

**गो०**—वितंडवाद का! खरंच आहे—तुमच्या सारख्यांना असलें मत पसंत होणें नाहींच! बरें तें असो, पण बाळंभट, कसं काय खुब लग्नाबिग्नांची चंगळ ना? यंदा तुमच्या यजमानांत कोठें लग्नें आहेत का?

**बा०**—अहो लग्नाला काय वाण आहे, शिनूचं कोठें जमत नाहीं.

**गो०**—होय बाळंभटजी, हीच शिन्ची पंचाईत. या परभांत तर बुवा अलीकडेस फार दंगा माजला आहे. हुंडा! त्याशिवाय गोष्टच नाहीं! ज्यांच्या पोटीं मुली असतील त्या बिचाऱ्या गरिबांनीं काय करावें! ते आमचे दिनकरराव. त्यांच्या मुलीस यंदा विसावं वर्ष लागलं, तरी अजून तिला कुठें नवरा मिळत नाहीं. तसाच तो विनायकराव, त्याचीही मुलगी केवढी वाढली आहे. जिकडे जावें तिकडे कोणी मागतो दोन शेर सोनें, कोणी मागतो अडीच शेर सोनें, येऊन जाऊन सोन्याची गोष्ट. हा मी सकाळीं नवेवाडींतल्या शामरावाकडे गेलों होतों.

**बा०**—शामराव कोण, आमचे यजमान?

**गो०**—होय तेच. त्यांच्या दुसऱ्या मुलाला एकाची मुलगी सांगावयाची होती.

**बा०**—कोणाची हो मुलगी?

**गो०**—मुलगी का? कांदेवाडींतल्या वकिलाची?

**बा०**—अं. तें जमेल तर. अहो तीं दोन्हीं पडलीं धेंडें. त्यांना काय कमी!

**गो०**—कांहो बाळंभट, त्या तुमच्या सुंदररावाच्या मुलीला नवरा मिळाला का?

**बा०**—छेहो. आज तीन वर्षें झालीं माझी सतत खटपट चालली आहे, पण कोठें जमत नाहीं. अहो पैशाशिवाय कसचं जमतं.

**गो०**—खरोखरच. अहो बाळंभट या पोरी वाढून पुढें होणार तरी काय?

**बा०**—तुम्ही तर गोविंदभट अगदीं परभांचे हितचिंतक बनलेत. त्यांची तुम्हाला फारच कींव येतें म्हणावयाची, जणों काय तुम्हीं त्यांच्यापैकींच एक. आपण ब्राह्मण आहांत हें विसरलेत काय?

**गो०**—तसें नव्हे हो. परंतु आपण ज्यांच्या जिवावर आपला चरितार्थ चालवितों त्यांचें हित चिंतणें यांत वावगें तें काय झालें? बाळंभट, तुम्ही लक्षांत ठेवा कीं हा गोविंदभट खाल्लया घरचे वांसे मोजणारा नव्हे बरें. कसेही असो, ते आपले अन्नदाते झालें तेव्हां त्यांचे हित चिंतणें हेंच आपलें कर्तव्यकर्म होय.

**बा०**—काय म्हणतां तुम्ही गोविंदभट! हे हो कसले आपले अन्नदाते! ईश्वर आमचा अन्नदाता! आणि आपणांस त्यांजपासून जी प्राप्ति आहे ती आपल्या मेहनतीबद्दल. उद्यां तुम्ही त्यांचें काम करूं नका आणि मग पहा. गोविंदभट माझ्यासमोर हें म्हटलेंत म्हणून चिंता नाहीं पण असें दुसऱ्या कोणासमोर म्हणालेत तर ते तुम्हांस वेड्यांत काढतील. आणखी गोविंदभट, मी तुम्हांस खरेंच. सांगतों या परभांसारखे अधर्मी कर्मभ्रष्ट लोक इतरांत कोठेंही सांपडावयाचे नाहींत.

**गो०**—छेः छेः हें काय म्हणतां बाळंभट. अहो, जेथें गांव तेथें महारवाडा असावयाचाच. परभांत म्हणजे पापाचरण करणारे अधिक आणि ब्राह्मणांत म्हणजे कमी असें कांहीं नाहीं. घरोघरीं मातीच्याच चुली आहेत. यांतच शहाण्यांनीं समजून घ्यावें म्हणजे झालें.

**बा०**—पुरें झाला आपला उपदेश. बरं आतां पुष्कळ वेळ झाला. नरहरीची भेट होत नाहीं. पुन्हां कधीं येऊं. मला जरूरीच्या कामास जावयाचें आहे.

**गो०**—या तर. बोलल्या चालल्याचा राग नकाहो मानूं! ( बा. जातो. )

**गो०**—चला आपणही थोरल्या ठाकुरद्वारीं जाऊं. शास्त्रीबुवांचे पुराण अजून आटोपलें नसेल. ( जातो. )

---

## प्रवेश ४ था.

( **स्थळ**—रस्ता )

[ **गोविंदभट.** ]

**गो०**—[ स्वगत ] या बाळंभटाच्या बोलण्यांत किती निमकहरामी तरी! खाल्लया घरचे वांसे मोजणें हें महत्पाप होय. आम्हां उपाध्यांस इतर कोणत्याही स्थलीं थारा नाहीं. परंतु परभु जातीमध्यें आम्हांस केवढा मान मिळतो बरें! आम्हां लोकांची त्यांच्या जिवावरच पोटें भरतात—त्यांनीं जर आम्हांस आज जा म्हणून सांगितलें तर आमची वाट काय? इतर जातींप्रमाणें त्यांनीं आपल्या जातींतलेच ब्राह्मण बनविले तर आम्हांस थारा कोठें मिळेल! खरोखर आमचें सगळें जीवन या लोकांवर सर्वथैव अवलंबून राहिलें आहे. असें असून आम्हांपैकीं शेंकडा नव्वद असामी या लोकांची नेहमीं खोटी नालस्त करितात. हें त्यांस लज्जास्पद नव्हे काय! बरें, आह्मांस जो एवढा या लोकांत मान मिळतो त्याप्रमाणें आमचें वर्तन तरी असावें तसें निर्मळ आहे का! यजमानास कडकडीत उपोषण असलें तरी आह्मी घरीं यथेच्छ पोटपूजा आटपून मग पूजा सांगण्यास जातों. यजमान बिचारा भावार्थानें आह्मांस योग्य मान देऊन आमची संभावना करतो पण त्याचा मोबदला काय—तोंडापुरते आशीर्वाद पण मागाहून निंदा व शिव्या! हर! हर! हा त्यांच्या चांगुलपणाचा व धार्मिक बुद्धीचा आम्ही असा गैरवाजवी लाभ घेतों. बिचारी यजमानीणबाई मोठ्या भावार्थानें उपाध्यास भुले-

श्वरास तांदुळ पैसा अथवा पूजा घेऊन जाण्यास सांगते, पण हरामखोर देवळांत पाय ठेवील तर शपथ! बरें पूजा इत्यादि कर्मे तरी आम्ही यथाशास्त्र चालवितों? छः नांव नको! लेकानें पाठांतर केलें असेल तर ना! बाप उपाध्या–पोरही उपाध्या बनला. मंत्र नाहीं आठवला तर दे पंचतंत्रांतला एकादा श्लोक म्हणून! हल्लींच्या यजमानास तरी त्यांतला भेद कोठें समजतोय! अलिकडे लग्नादि कार्यांत चांगले, मोठी आढ्यता मिरविणारे उपाध्येही गडबडगुंडा करून जेमतेम सावधान करून टाकतात झालें! फार काय सांगू! अगदीं सुवेर सुतकांत लग्नें लावून देणारे असेही कुलांगार आमच्यांत कांहीं उपजले आहेत! शिव! शिव! माझ्या हातून अशी गोष्ट कधींही घडली नाहीं व पुढेंही घडून येणार नाहीं! त्यांनां योग्य वाटेल तसें ते करोत! ज्याला त्याला स्वकर्मांचीं फळें भोगणें आहेच! तें कांहीं चुकत नाहीं. आणखी तेंही इथल्या इथेंच, व तो वेळही समीपच आला आहे. आमच्या यजमानांत जुने व म्हातारे जोंपर्यंत आहेत तोंपर्यंत हीं आमचीं थोतांडें चालतील. मग नव्या पल्लवीच्या राज्यांत आमच्यां लोकांनीं एक तर दुसरा धंदा पतकरला पाहिजे अथवा दारोदार झोळी घेऊन भीक मागत फिरलें पाहिजे. असो. त्याची आपणांस पंचाईत कशास हवी. माझीं काय दहा गेलीं पांच राहिलीं! चला, वेळ बराच झाला! बोलण्याच्या नादांत वेळाचें भान राहिलें नाहीं. आतां पाय उचलला पाहिजे!

[ ठाकुरद्वाराकडे जातात. ]

---

## प्रवेश ५ वा.

( **स्थळ**—विठ्ठलवाडी–खंडेरावाचें घर. )

**[ खंडेराव व सोनाबाई. ]**

[ खंडेराव खोलींत गुडगुडी ओढीत बसले आहेत. ]

**खं०**—[ मोठ्यानें ] अग ऐकलस कां? अग–इकडे ये–अग–अग–आयकाला येते कनांय?

**सो०**—[ आंतूनच ]–हो–हो–आयकलंनं. [ बाहेर येऊन ] ही मी आलुं. का माझे बगर अडलंय?

**खं०**—अग बस तर खरी. मगशी मी सांगतय.

**सो०**—ही मी बसलुं. [ बसते ] बोला का हाय ते यकदाचं.

**खं०**—हे बग. आपले शामाला का नाय एक सोकरी सांगून आलय.

**सो०**—आलंशेल, त्यांन ते का मोठं नवल झालं. अवढच नं! का बा तुमाला घाती घालाची सवय—कणाला खबर. अवढसं अशेल त्याचं अवढसं कराच.

**खं०**—अग नवल का मी सांगतय! अशा शेपन्नास सांगून आल्या! पण हिची आई क नाय मोठी गब्बर हाय. तिच घरदार सगळ काय हाय ते ती सोकरीचे नांवावर करणार. खरच, बग हा लाट साधला कनाय तर आपल सगळ जन्माच दळिदर नायस होयल.

**सो०**—जळ्ळा मेला तो लोभ. मेलं दळिदर ते पायजे तरी कणाला!

**खं०**—तस नायग. मी अस बोलतय का आपुण दळिद्री हांव ह्मगूण. पण तूंच बग. पांच हजार लानी सानी रकम हाय का! अग या काळान् अवडा पैसा देते कोण! तुमाला बायकांना का! तुमची सगळी हऊस दागिने न कपडे-लत्ते यामदी. तुमाला तवडं मिळालं ह्मणजे झालं. पण हें सगळं पैशाबगर येत नाय, समजलीस!

**सो०**—बर बर ते समजलं. पण ती सोकरी तरी कणाची?

**खं०**—सोकरी का? सोकरी लोवारचाळीनचा तो रामभाऊ होता न त्याची.

**सो०**—ती का सोकरी? हो, सगळेकडे यादवन फिरल, कोटे नवरा नाय मिळे—तंव इकडे आले वाटते विचाराला. नको बा. ती सोन्याभरली नको.

**खं**—का? का? तिला अवढ का झाल? का नकटी हाय? का थोटी हाय? अशी ते का गोम हाय?

**सो०**—सांगीन मगशी. आत का त्याची घाय नाय गेली.

**खं०**—अग पण सांग ते खरी.

**सो०**—सांगुच का? पण नको. मेले भितीला पण कान असतान.

**खं०**—अग पण माजे कानांन सांग—मग ते हरकत नाय?

**सो०**—ऐका ते—[ कानांत कांहीं सांगते. ] आल, आतं ध्यानांन आल?

**खं०**—पण गोष्ट खरी का? नायते अशेल एकादी थाप. आपले लोकांन् असे निंदक लोक पुष्कळ हान. बग, अशा गोष्टीवर भरंवसा ठेऊन आपुण मातर पांच हजारांला आंचवूं.

**सो०**—जळ्ळे ते पांच हजार. अहो ती गोष्ट खरी हाय—खरी हाय. खोटी नाय. [ इतक्यांत बाळंभट येतात ]

**खं**—कसं काय बाळंभट ?

**बा०**—ठीक आहे आपणासारख्यांच्या मेहेरबानीनें.

**खं०**—कां आज इकडे कोठें ?

**सो०**—[ हंसत हंसत ] ते कामाशिवाय बरें येतीन. अशेल काय तरी काम म्हणूण अलसतील.

**बा०**—दादीबाई, तुम्हीं ह्मटलेंत त्यांत कांहीं खोटें नाहीं. ज्यांच्या येथें मुलगे आहेत त्यांच्या येथें पायमळणी केल्याखेरीज आमच्या यजमानांची कार्यें ती कशीं होणार ! कांहो दादीबाई, यंदा शामरावाचें लग्न करति नाहीं का ?

**सो०**—असा विचार हाय खरा; पण यांचे मनासारखी सोकरी कोठें मिळे नाय न !

**बा०**—[ मनांत ] यांच्या मनासारखी मुलगी ह्मणजे जी मोठ्यांत मोठा हुंडा घेऊन येईल ती. मग मुलगी कोणाची व कशीही असली तरी चालेल ! (उघड) दादीबाई, माझ्या पहाण्यांतली एक मुलगी आहे. मुलगी स्वभावानें गरीब, व दिसण्यांत चांगली असून कुलीन घराण्यांतली आहे.

**सो०**—कोणाची हो बाळंभट ?

**बा०**—पोपटवाडींतील सुंदरराव—त्यांची.

**सो०**—हं ! हं ! समजलं. त्या दारकाबायमावशीची नात. काशीबायची सोकरी तीच न ?

**बा०**—होय तीच. आणि काशीबाईनें तुह्मांला सांगायला सांगितलंय कीं रीतबीत हौसेसारखी करूं.

**सो०**—सोकरी ते बा बरी हाय.

**बा०**—( मनांत ) एक अडचण पार पडली. आतां हुंड्याची गोष्ट आली तेवढी संभाळली पाहिजे, ह्मणजे झालें. ( उघड ) मग ठेवतां का तिचें यादवन ?

**खं०**—पण रीतबीत कशी का ? सोनं कवडं देणार ?

**बा०**—( मनांत ) आणीबाणीचा प्रसंग हाच ! ( उघड ) दादाजी, हें पहा. सुंदरराव खाऊनपिऊन संसार संभाळून आहेत. त्यांना श्रीमंतांत गणवत नाहीं आणि केवळ गरीबांतही ते मोडत नाहींत. तथापि ते मोठे हौसी असून यथाशक्ति जांवयास देतील. त्यांची ही पहिली मुलगी आहे तेव्हां ते आपल्याकडून कमी पडूं देणार नाहींत.

**सो०**—मला ते वाटते का हें यादवन ठेवावं. कसं का तुमचे मनास येते का.

**खं०**—नाय ! नाय ! ते काय कामाच नाय. तूं हायस वेडी. तुला नाय अक्कल, तुमा बायकांना या गोष्टीच ज्ञान मुळीच नाय. बाळंभट, सुंदरराव किती शेर सोनं देणार त्याची नीट चौकशी करून या. अन् भातक–रुखवत–बगाचे न समजवणीचे कपडे, गौरवाची पातळ न वरसाचे सगळे सण करतीन का नाय याची पण चौकशी करून या. अवढ होत अशेल तर मगशी यादवन ठेवाचा विचार. माझा हाय सोकरा–अजून दोन वरसं वाढला तरी हरकत नाय–समजलेत.

**सो०**—हो !! आणखी दोन वरसांनीं हुंड्याची किंमत पण वाढेल ! तीन शेरांचे चार पांच शेर होतील !

**खं०**—बस ! बस ! फार शहाणी हायस ! अशेल तुझे सोयऱ्यांची सोकरी ह्मगूण भाळलीस अवढी तिचेवर ! पण मी कोठें ऐकणार हाय. पैशाचे कामांत बायकांनीं मन नाय घालाव. ते काम आमचे सारखे पुरुषांचं बाळंभट तुह्मी इचे बोलण्यावरती लक्ष देव नका. हे बगा. मी सांगितलंय त्या परमाणें होत अशेल तर माझेकडून हरकत नाय, मी होबासा देन. सोनं पण पुष्कळ सांगितलं नाय हो ? ती सोकरी इचे सोयऱ्यांनची नसती अथवा सुंदरराव माझा फ्रेंड नसता तर तीन शेरांमदी एक वाल पण कमी केला नसता–एक वाल ! बोला, बाळंभट तुमीच बोला–बोला–बोला–तुमीच बोला–गरजवंत कोण ? सोकरीचा बाप का सोकऱ्याचा बाप ? खर बोला. उगीच तोंडापुरतं बोलूं नका. माझी शपथ हाय तुमाला.

**बा०**—तें मी काय सांगूं ?

**खं०**—अन् हें बगा. बाळंभट, तुमाला दुसरं सांगतय. शामाला आज एक सोकरी सांगून आलय. तिची आई पांच हजार रुपये देवाला कबूल हाय, पांच हजार. काय समजलेत तुमी ! क्याश हार्ड क्याश !

**बा०**—असेल. मुलींना आजकाल काय कमताई आहे ? एक सोडून पांचशें सांगून येतील. पण हें बघा दादाजी, अमळ सुंदररावाच्या स्थितीकडे लक्ष देऊन आपला निर्णय सांगाल तर ठीक.

**खं**—[ रागावून [ हें बगा बाळंभट. मी इकडे काय धरम कराला बसलुं, नाय. माजे हान सोकरे, तसेच वराडल्याशिवाय रायले तरी बेहत्तर. पण मी

कधीं एक वाल सोन्यामदी कमी करणार नाय. अशेल ज्यांना गरज ते देतील सोकरी. पाठीला लागून देतील-अवो पाठीला लागून. अशे बगता का माजे तोंडाकडे?

**बा०**—जशी आपली मर्जी. मी आपला निरोप सुंदररावांना कळवितों. येतों तर आतां. दादीबाई, येतों मी आतां.

**सो०**—या.

**खं०**—बाळंभटजी, माजा निरोप नीट सांगा हं. ( बाळंभट जातात. )

**खं०**—(हंसत-हंसत) कां. उडवली का नाय गंमत !

**सो०**—वा ! मोठीच गंमत ! लोकांचे वरती जुल्म करावा न त्याला बोलावी गंमत ! म्हणतांत न उंदराचा जीव जाते न मांजर ओव्या गाते !

**खं०**—अरेच्चा ! येरे माझ्या मागल्या ! तुझं तेचन तेच ! याला जुल्म का बोलतांन ? अग हा देवाघेवाचा वेवार !

**सो०**—जुल्म नाय जुलमाचा बाप. तुमीच सुंदररावचे ठिकाणीं असतेत तर मगशी तुमाला हें कस वाटल असत ?

**खं०**—बस बस ! तूं शहाणी हायस. मी इकडे काय परोपकार कराला बसलुं नाय.

**सो०**—केलेत तुमीं परोपकार. तुमाला माणुसपण हाय कोठें. तुमाला पैसा तवढा दिसते. अन पैशासाठीं तुमी एकाद झोड पण सोकऱ्याचे गळ्यान बांधाला चुकणार नाय !

**खं०**—हं ! हं ! अस तू का तरी बोलतेस ! वेडी कोठची. सोकरीच कुळशील पण बगाला पायजे हो ! अन पैशाकडे पण जरा नजर फेकाला पायजेते ! या कामान अगदींच भोळेपणा नाय कामाचा !

**सो०**—आहा हा ! काय हीं मानभावाचीं बोलणीं ! तुमचे बरोबर बोलाला लोखंडाचं तोंड पायजे. चला बाई. इकडे गोष्टी करून पोट नाय भराच. राम्या अरे-राम्या-

**रा०**—( आंतून ) जे—

**सो०**—अरे बाजारान जावाच नाय का ! सांज झाली न ! चला बाई त्याचे पाठीस लागेन तंव मेला जायल. ( जाते. )

**खं०**—अजून जेवणाला बराच वखत हाय-चला, जरा दर्यावरून फिरून येवं. ( जातो. )

---

## प्रवेश ६ वा.

( **स्थळ**—चिन्याचे बाजाराचा रस्ता. )

[ **रामा व गोविंदा.** ]

( एका बाजूनें रामा गडी हातांत बाजाराची टोपली घेऊन जात आहे. इतक्यांत समोरून गोविंदा गडीही हातांत टोपली घेऊन येतो. )

**रा०**—राम राम हो ! मामा रामराम !

**गो०**—रामराम ! रामराम !

**रा०**—कसं काय ? ठीक हाय नं ?

**गो०**—व्हंय, आपलं चाललंय.

**रा०**—पन आज तुमी यकटे कसे बाजारामंदी आलंव ? श्येट कां पाठसान येतांत वाटतं ? नाय तर तुमासनी येकट्यासनी बाजारामंदी कंदीच बा बगतलं नाय. जंवं बगावं तंवं श्येट आपले संगाती हैतच. आपनाला बा असं कंदी नाय चालनार.

**गो०**—काय करतांवं. आमचे इतं चाकराकडनं काइंच का आनत नाय; संमद श्येट संवतां घेऊनश्यान येतांन

**रा०**—हां बोवा आपनासनी कंदी नाय पतकरनार. संमदंच श्येट आनायासनी बसल तर मंग पानसुपारीसनी अरदी दुगानी खुटनं मिलनार ?

**गो०**—व्हंय बोवा. आपनासनी असा अरदी दुगानीचा लाभ कंदीच कां मिलत न्हाई.

**रा०**—त्याइपीं ह्मनाल तर आमची कां लईच चंगाल. बाजार आननार कां मी. शाक भाजी आननार कां मी. तुप त्येल आननार का मी. संमदंच कां आननार मी ! आमच्या श्येटनां या गोसटीचा लईच तरास. थोरले श्येट झाल म्हातार त्यांच्यानं काय पोरावानीं उठबस भाइर जावंतं. अन धाकट श्येट का असतान सदा मंजेमदी. नेमीच कां नाच टिपनी होतातच हाईत. घरांमंदी अगदींच कां धीयान न्हाय–शनवार तर टिपनी बगर गेलांच न्हाय. अनी दररोज रांतचां कलप हाईच. जेवलं कां चाललं बंगलीवर. घरामंदी काय हाय नी काय नाय त्येची परवा कोनासनी हाय. घरामंदी काय का व्हयना.

**गो०**—तसं नव्हं. त्याचं कारन येगलंच हांय. श्येट लोक पडले तंव घाणीमंदी कोण जातंय. बाजारामंदी थोडी कां घाण परमाळत्ये.

**रा०**—काय तुमी तरी सांगतांव मामा! अवो बाजार आनायासनी घान अन गटगटा बोमिल नी सरंगे नी करंदी खांयासनी घान नाय वाटत. अव तसं नव्हं. मोठे श्येट लोक पडले नी हं हलकं काम कोन करतांय.

**गो०**—मंग काय तुमचे शेट कंवंच बाजारामंदी नाय जात वाटतं?

**रा०**—छेः नांव नकां काढूं त्यांचं. अन कंदी गेलंच तर मंग काय दोन दिडक्याचं मालाला दे दोन आने. अवं ते कशाला. तुमाला काय सांगुं मामा— अवं काल कां परवांचे रोज बाजारामंदी कां आलते एक भले थोरले श्येट पन बगाल तर बटाटी दोन दिडक्या शेर कां दोन आने शेर मिलतांन—तं दिखी म्हाइत नाय. मंग काय रुपयान रुपयांचा फडशा उडाला. अन माल बगाल तर कवडी मोलांचा नाय. संमदा हलका माल. अव आमी तसां माल नेलां असतां तर आमासनी बोलून बोलून घेतलंसतं. पन सोनारांन नाक टोंचलं—मंग बोलतांन काय!

**गो०**—बराबर हाय. कंदी बाजारामंदी आलसतील तंव कां नाय. अव पन ते द्या सोडून. अव तुमी संमदं आनतांव तर दर मइन्यांसनीं एक दोन रुपये पगारापेक्षां पडतांतच हांयत. खरं कां नाय?

**रा०**—दर मइन्यासनी कां? अव पडतांत कंदी दोन कंदी तीन. चाललयं अव तलं राखायासनी बसलं तर पानी चाखल्या बगर राहातंय कां मानूस?

**गो०**—लाट हाय बुवा तुमचा. अव पन येवढं रुपये कसं मिल्तांन तं सांगाल तर खरं.

**रा०**—अव ते काय पुसतांव. अव सकाल सांज बाजार आनन्यांत काय मिलनार? लई झालं तर दोन तीन दिडक्या अन् काय. पन दाना आनी तूप त्येल यामंदी खुब मिलतं. अव, दानेवाल्याचं हतनं दाना आनायांसनी गेलांव झंजे थतनं मेजाचा घेऊनशी तेच्यातल्या पांच सा टिपऱ्या दिहीसरे दुकानावर इका-याच्या—तेल मनभर आनायासनी सांगितलं कां दोन तीन शेर कमी आनायच. असं हथनं थतनं मिलविलन झंजे होतं आपलं काम नि काय.

**गो०**—तुमी लईच कां नशीबवान! असं आनन्या नेन्यांत आमासनी काय पन मिलत नाय. इकतंच नाय, पन घरांमंदी बी चोरी मारी करायासनी सोय नाय. संमदं टाल्याकुलपांत.

**रा०**—त्या इषी म्हनाल तर आमच्या घरांत पर तसंच. पन चोरी करनारासनी हजार डोले. त्यांतून बी डोल्यांत तेल घालूनशनी आमी आमचं काम करतांव. हं. समजलांव.

**गो०**—( रामाच्या टोपलींत पाहून ) अहो पण, हां काय तुमच्या टोपलीमंदी चकाकतंय ?

**रा०**—( टोपली बगलेंत मारून ) काय नायवो मामा. उंगीच—आपलं.

**गो०**—पन दावाल तर खरां. आमी घेऊनशेनीं थोडंच जातांव.

**रा०**—( टोपलींतून एक ब्रांडीची बाटली काढून ) हां बगातर. बिगिबिगीशी बगा. न्हाय तर कुनी पाइल. हां कां नाय आमचे श्येमराव श्येटचा रोजचा का उकडा. त्ये बेजमजी फारश्याच्या दुकानामंदशी आनलीन ! ( आंत ठेवतो. )

**गो०** काय म्हनतां ? रोजची असगी बाटली !

**रा०**—हांत्याच्या. अव यवढीन काय होतांय. चार पांच जणां जमले कीं मग बाटल्यांवर बाटल्यां न काय. अव हां त्यांचा एक घोट. काय मामा, अव तुमी आमी सणावारांला पितांव. पण यांना त्याबगर एक दीस नाय चालायचं. अव ही अवदसा—अवदसा—अन काय.

**गो०**—चला. एळ लई झाला. ते आमचे श्येट पन आले.

**रा०**—व्हय. लई एळ झाला. चला—आपन संगाती जांवया ( जातात. )

---

## प्रवेश ७ वा.

( **स्थळ**-सुंदररावाचें घर. )

**[ सुंदरराव व काशीबाई ]**

**सुं०**—मग येतो का खंडेरावचा मुलगा तुझ्या पसंतीला ?

**का०**—न येऊन काय करायचं. बिजवर तर बिजवर आणि अशा ढंगाचा.

**सुं०**—तशांत त्याची पंहिली बायको त्याच्याच त्रासानें मेली असें ऐकतों.

**का०**—हो, पण करतां काय ! पोरीचं तेवढं कुवारपण तें नाहींसं होईल. मग तिचं नशीब आणि ती.

**सुं०**—छे ! छे! आपण होऊन आपल्या मुलीस अशा दुःखांत टाकण्यापेक्षां ती आपल्या इथेंच राहिलेली बरी.

**का०**—पण आणखी तिला किती दिवस संभाळणार! मेलं या पोरीच्या पायीं कोठें जाणं होत नाहीं येणं होत नाहीं.

**सुं०**—तूं ह्मणतेस हेंच खरें! आपली बेनु आतां वयांत आली. तिला सांभाळणें आतां कठीण. खरें, पण जाणूनबुजून अशा ढंगाच्या नवऱ्यास द्यावी तरी कशी?

**का०**—याच्यापेक्षां वाईट नवरे नसतात का? आणि समजा लगीन झाल्या-वर नवरा वाईट निघाला तर त्याला काय करतात? तसंच समजावं म्हणजे झालं.

**सुं०**—ठीक आहे तर—तुझ्या पसंतीस पडलें ह्मणजे झालें. मग पुढें त्रास नको. पण आतां पैशाची तजवीज कशी होते? दोन शेर सोन्यापुरते पैसे कोठून आणूं? एवढी रकम मिळणार कशी?

**का०**—दोन शेर कसं? फुलं भराचा बारा तोळ्यांचा गोप विसरलेत वाटतं?

**सुं०**—घे तर. अडीच शेर झालं. नशीब तीन शेरांचा आग्रह धरून बसलें नाहीं. पण एवढे पैसे कोठून आणूं?

**का०**—तें मी काय सांगूं?

**सुं०**—( विचार करून ) सर्व मिळून कमींतकमी तीन साडेतीन हजार रुपये लागतील. तेराशें चवदाशें रुपये नुसते सोन्यांत गेले. दोन तीनशांचें रुपें होईल. मग एक हजारांत इतर सर्व खर्च आटपला पाहिजे.

**का०**—एक हजारांत तो बाकीचा खर्च कसा आटपणार! कपडेबिपडे त्यांतच कसे येतील? मेलं हौसेसारखं तरी कांहीं पाहिजेना?

**सुं०**—हें पहा, तूं या वेळीं तुझी हौस बिऊस एकीकडे ठेव. एकच मुलगी नाहीं. दुसरी आणखी आहे. शिवाय बाळा आहे. त्यांच्या लग्नांत तुझी हौस पुरवीन. त्या वेळेस पगारही वाढेल. हल्लीं आपल्या शक्तीपलीकडे खर्च करण्याची जरूरी नाहीं. अगत्याचें तेवढेंच करूं म्हणजे झालें. कां, तुझें तोंड कां उतरलें? मी ह्मणत होतों तुझ्यासारखी शहाणी बायको विरळा. हेंच कां तें तुझें शहाणपण! मुलाबाळांच्या लग्नकार्यादि प्रसंगीं आईबापांची, व विशेषता आईची हौस खरीः परंतु हें पहा, आपल्या शक्तीपलीकडे खर्च करून मग दुःख भोगणें हें बरें, किंवा आतांच शक्तीप्रमाणें खर्च बेताबातानें करून मग पंचाईतींत न पडणें हें बरें?

बोल. तूं शहाणी आहेस. तुला सर्व कांहीं समजतें--तूं इतर बायकांसारखी उतावळी व असमंजस नाहींस.

**का०**—हो खरंच. आपण काय, आपली हौस आज पुरवून घेऊं. पण पुढें निस्तरावं लागेल आपल्यालाच ना !

**सुं०**—शाबास ! कशी बोललीस बरं. बायको असावी तर अशी शहाणी असावी. नाहींतर कित्येक बायका अशा असतात कीं नवऱ्याच्या मनांत दहा रुपये खर्चावे असें असलें तर त्या शंभर रुपये खर्चा म्हणून सांगणार. आपल्या लोकांतील बायकांचा उधळा स्वभाव फार आहे व त्या जर नीट काटकसर करून संसार चालवित्या व आपल्या नवऱ्यांस वेळोंवेळीं मन वळविणाऱ्या शब्दांनीं ताळ्यावर आणण्याचा प्रयत्न करत्या तर आमच्या लोकांत ला घेण्याचा जो प्रकार वारंवार दृष्टीस पडतो तो पडताना. असो. हिच्यासारखी स्त्री माझ्या वांट्यास आली हें मी माझें मोठें भाग्यच समजतों. ( विचार करून ) पण तीन हजार रुपये मिळतील कसे ? इतके पैसे कोण देईल ?

**का०**—तुमचे जिवाचे सोबती आहेत. त्यांजजवळ कां गोष्ट काढीत नाहीं ?

**सुं०**—( हंसून ) ठीक ! ठीक ! तुला या जगाचा अनुभव नाहीं म्हणून तूं हें म्हटलेंस ते ठीक केलेंस ! परंतु मला तुझ्यापेक्षां या जगाचा अधिक अनुभव आहे ! तुला सांगतों सोयरे मित्र हे चालत्या काळाचे आहेत ! आणि पैशाची गोष्ट आली म्हणजे मग मैत्री हा शद्बच विसरावा. मित्रांपासून कवडीचीही आशा करूं नये ! त्यापेक्षां एकाद्या सावकाराकडून उसने काढलेले पतकरले. तो आपल्या सहीवर पैसे देईल. परंतु मित्रांकडे जाऊन पैसे मागितले असतां मग एकेकाचे जें तोंड सुटतें तें काय विचारावें ! तें त्यांचे हृदयास टोंचणारे शद्ब ऐकण्यापेक्षां मरणही पत्करतें ! असो. यावरून तुझी खात्री होईल कीं मित्रांकडून कवडीचीही आशा करणें म्हणजे व्यर्थ आहे.

**का०**—पण कोणाजवळ गोष्ट काढली होती का ?

**सुं०**—तूं कीं नाहीं जितकी शहाणी आहेस तितकीच वेडी आहेस. मित्रांजवळ गोष्ट काढून माझा स्वतांचा अपमान करून घेऊं कां ?

**का०**—जशी आपली मर्जी ! मी आपला एक उपाय सुचविला.

**सुं०**—त्याबद्दल मी तुला दोष देतों आहे का ? असो. पैशाच्या तजविजीकडे लागलं पाहिजे. ( आंतून ) आई–आई—

**का०**—कोणरे ? बाळा कांरे ?

**बा०**—आई, विश्वासराव आलय तो तुला बोलावतय.

**का०**—चल मी आलें. ( जाते. ती गेल्यावर ).

**सुं०**—( विचार करून ) आतां कोणा सावकाराकडून पैसे काढल्याखेरीज उपाय नाहीं ! काय करतां ! निरुपायास्तव तसें केलें पाहिजे ! म्हणतात ना, प्रत्यक्ष अनुभवावांचून कोणतीही गोष्ट समजत नाहीं. मीच इतके दिवस म्हणत होतों हे आमचे परभु लोक कर्ज कशाला काढतात ? मला वाटत असे कीं जर मनुष्यानें दृढनिश्चय केला कीं कवडीचे कर्ज म्हणून करावयाचें नाहीं तर तो कर्जबाजारी कधींही व्हावयाचा नाहीं. पण हे सर्व विचार जोंपर्यंत इंगा फिरला नाहीं तोंपर्यंत ! माझाही असाच दृढ निश्चय ! व त्याप्रमाणें मीं आजपर्यंत एका कवडीचेंही कर्ज काढलें नाहीं. परंतु आतां कर्ज काढल्याशिवाय उपाय आहे का ? येथें माझा दृढ निश्चय काय करील ? कर्ज न काढले तर पैसे मिळणार नाहींत ! पैसे न मिळाले तर मुलीचे लग्न होत नाहीं ! झालं, इकडे सर्व अडतें ! मुलीचें लग्न तर केलें पाहिजे ! इतकें दिवस तिला तशीच ठेविली. पण आतां आणखी किती दिवस ठेवणार ? मुलगी उपवर झाली. उपवर मुलगीला संभाळणें किती कठीण आहे हें ज्यांच्या पदरीं उपवर झालेल्या मुली असतील त्यांच्या माहितींतलें असेंलच. बरें, हिला तशीच सांभाळीन म्हणेन तर तिच्या पाठोपाठ उपवर झालेली पुतु आहेच. बेनु समाधानवृत्तीची मुलगी आहे, परंतु पुतुस आपल्या स्थितीविषयीं वाईट वाटत असतें. आतांशा तिचें खाणेंपिणेंही नीट चालत नाहीं असें परवांच ती म्हणाली. बेनूचें लग्न झालें नाहीं तों पुतूच्या लग्नाच्या तजविजीस लागलें पाहिजे. एकूण कटकट व चिंता यांतून सुटका नाहीं ! असो ! परमेश्वराची मर्जी ! आपण काय करणार ! कपाळीं असेल तें कांहीं केल्या चुकतें काय ? चला, अंमळ विनायकरावाकडे जाऊं. पुष्कळ दिवस भेटलों नाहीं त्याला. कोण आहे रे तिकडे ? रामा–अरे रामा—

**बाळा०**—( आंतून येऊन ) दादाजी काय पाहिजे तुम्हांला ? रामाला आईनें बाहेर पाठविलं आहे.

**सुं०**—तिला सांग–चहा झाला असेल तर काढून ठेव म्हणून. मी आंतच येतों. विश्वासरावाला म्हणावं जाऊं नकोस. ( जातात. )

---

## प्रवेश ८ वा.

( **स्थळ**—रस्ता. )

[ **शामराव.** ]

**शा०**—( स्वगत. ) फ्रेन्ड्स् तर पार्टी मागतात. जवळ एक पाईस् नाहीं. पे-डे लांब राहिला. पार्टीसाठीं पैसे आणावे कोठून ? नाहीं नाहीं ह्मणत असतांही त्यांनीं हें ल्चांड गळ्यांत घातलेंच, व मी भिडेनें त्यांनां प्रॉमिस्ही देऊन चुकलों. तें सगळं ठीक झालं पण पैशाचं सोंग कसं येतं ! कांहीं दिवस थांबा ह्मणालों तर ऐकत नाहींत. नेक्स्ट् स्याटरडेचा दिवस ठरविला आहे. दीडशें रुपये मिळतात कसे ? ( विचार करून ) पण मी वेडा तर नाहींना ! इतक्या विचारांत कशाला पडलों ! आमचे ब्यांकर्स मेसर्स नगा भगा अँड् को तर कोठें गेले नाहींत ना ! वा ! असे उदार सावकार पाहिजे तेव्हां पैसे द्यावयास तयार असतांना मला का पैशाची वाण ! हं ! हं ? कम् ऑन्. लेट् अस् गो टु देम्— [ जातो. ]

---

## प्रवेश ९ वा.

( **स्थळ**—रस्ता. )

( एक मारवाडी चालला आहे. त्याच्या पाठीमागें कांहीं पारशांचीं पोरें लागलीं आहेत. )

**पोरें०**—अरे ए हेटाजी !—तीनशेंड्या—( हातांतली चोपडी हिसकावून घेऊं पहातात. )

**मा०**—( चोपडी गच्च धरून ) चल साला. जावोछो के नहीं के बोलावुं सीपाइनें ? ( ओरडून ) सीपाई !

**पोरें**—हुर्यो—हुर्यो—( चेष्टा करीत जातात. )

**मा०**—साला पोरियाओ अमथा हेराण करे छे ! ( जाऊं लागतो इतक्यांत शामराव समोरून येतो त्यास पाहून ) अरे ए शामराव. अवड्या धांदलमदी कोठें चालला ?

**शा०**—कोण ? नगा ? वाः फार चांगलें झालें. मी तुझ्या दुकानावरच येत होतों.

**मा०**—हसा चडला ते देवाला के ? आण आण इकडेच दे पैसा ( हात पुढें करतो. )

**शा०**—नाहींरे बाबा. माझ्याच गरजेसाठीं तुझ्या दुकानावर येत होतों.

**मा०**—अरे तुला तो सदाची गरज हाय ! तुला दर महिन्याला काय तरी घेतल्या बगर चेन नाय पडते–टेव पडून गेला. खरा के नाय ?

**शा०**—( काकुळतेनें ) नगा, हें बघ मला दोनशें रुपयांची गरज आहे. फार गरज आहे.

**मा०**—( रागानें ) ती वारता मे नही सांभळेल. अगोदर पाछलचा रुपया देशेल तो पछी ते वारता.

**शा०**—पाठीमागील रुपये द्यावयाची शक्ति असती तर मग आज मला येथें यावयाची काय गरज असती ! हें पहा, मला पैशांची फार नड आहे. आई फार आजारी पडली आहे. तिला मोठा डाक्टर आणावयाचा आहे.

**मा०**—अरे ज्या. ते मे समदा समजते. उगीच आयेसला मांद्यामदी कसाला पाडते ? तुला मोज मारायला पायजे, नायते जुगारामंदी गमावाला पायजे ! वात खरी के नाय ? बोल !

**शा०**—( लाजून ) अरे तुला त्याचें काय ! तुला पैसे परत दिले म्हणजे झालें कीं नाहीं ?

**मा०**—अरे तू दर वखताला असाच बोलते. पण पैसा देवाला रडवते. आमच्या घरामंदी रुपयाची टांकसाळ हाय वाटते ? आमच्या घरांमंदी पैसा पिकते वाटते ? तुमचे परभु लोक पैसा घेवाला हुषार पण देवाला रडवते–रडवते.

**शा०**—( त्याच्या दाढीस हात लावून ) अरे पण नगा, गरजेच्या वेळेस असा अडवून धरतोस हें चांगलं काय ? मला खरोखर दोनशें रुपयांची मोठी गरज आहे.

**मा०**—असेल. मी कंव नाय म्हणते. पण माजा अगोदरचा पैसा टाक. त्याबगर मी तुजी गोष्ट नाय ऐकेल.

**शा०**—( विशेष काकुळतीनें ) नगा, आपली किती वर्षांची देवघेव आणि आतां तूं असें करतोसना ?

**मा०**—असा नाय तर कसा करेल ? तुमाला पैसा देत जायेल ! आणि तुमची तर देवाची वारता नाय ! आमचे घरीं पैसाचा झाड हाय वाटते ! हालवला के

पडला हजारो रुपया. काय शाण्यावानी गोष्टी सांगते! तुज्यावर सात हप्ता चढला. अवडे दिवस थांबला पण उद्यां फिर्याद करेल. नायते पगारावर टांच काढेल.

**शा०**—( पुन्हां त्याच्या दाढीस हात लावतो व लीनतेनें ) नगा! असं काय करतोस! या वेळेस माझी लाज राख. आईची शपथ पुढल्या मोस्तराला तुझे सगळे हप्ते चुकवीन!

**मा०**—अरे जा. पुढल्या मोस्तराला चीनचा तारवा येणार हाय वाटते! मग फसवाला पाते का? पण मी पक्का हाय समजलास.

**शा०**—अरे पुढल्या महिन्यांत माझें लगीन होणार आहे. तेव्हां सासऱ्याकडून जो हुंडा येईल त्यांतून तुझी सर्व रक्कम फेडून टाकीन. आतां तर खातरी झालीना?

**मा०**—( विचार करून ) बर! पायेल! पायेल! आज तर माजे जवळ पैसा नाय. सकाळचा ये. मग तिनशेची चिठ्ठी लिवून दे ने तुझा दोनशे रुपया घेऊन जा. पण आवते मोस्तराला समदा रुपया दिला पायजे हो! नायतर लागली फिर्याद करेल! हं!

**शा०**—अरे होयरे खचीत देईन. हें घे वचन. (वचन देऊन) मग राहूंना तुझ्या विश्वासावर? नाहींतर अगदीं ऐन वेळेवर घात करशील!

**मा०**—अरे नाय. मे एक वखत बोलला बस्स. उद्यां रातचा ये. पण आवते मोस्तरावर समदा पैसा देल ने?

**शा०**—अरे हो. आईची शपथ देईन. मग झालेंना? मी येतो आतां! उद्यां रात्रीं नऊ वाजतां येईन. पैसे तयार करून ठेव बरं.

**मा०**—बरा बरा आतां जा.

**शा०**—( जातां जातां ) आतां पार्टी देण्याला कोणाच्या बापाची भीति आहे?

**सांगा सगळ्यांनां हो आपुल्या क्लबच्या मेंबर्सनां**
**करा तयारी जाऊं चला या प्लेझर पार्टीला**
**सँटाक्रुस, माहीम, दादर अथवा परळाला**
**सॅटरडेचा बेत करूनी निघूं या इव्हिनिंगला**
**ब्रॅह्मिन कूकिंगला हो घेऊं नायकिण सिंगिंगला**
**उमरीगरच्या दुकानिं जाउनि ऑर्डर द्या त्याला**
**शॅंपेन, व्हिस्की, ब्रँडी ह्याविण रंग न पार्टीला**
**गेल्याबरोबर ब्रॅह्मिन लागेल कॉफी करायाला**

आपण सगळे मिळून बैसूं गाणे ऐकायला
कोणी सुचविती रागरागिण्या कोणी म्हणे संगीत
अशा प्रकारें मंडळी होतील बहुतचि ती रंगीत
मांड, कानडा, देस, असावरी, कालेंगडा, गज्ञल
सरते शेवटीं येऊन ठेपेल लावणीवर मज्ञल
लावणी ऐकून मंडळी इतुकी तल्लिन कीं होईल.
नाहीं कुणाला सुमार केव्हां रात्र निघून जाईल
उठा उठा मंडळी चला जाऊं कॉफी प्यायाला
मस्का, केळीं, जॅम, ब्रेडही घेऊं ब्रेकफास्टला
अर्ली मॉर्निंग ब्रेकफस्ट करून निघूं या फिरायाला.
दोघे चौघे मिळूनी जाऊं फिश-मार्केटींगला
मटन, फीश आणि व्हेजीटेबल घेऊनियां येऊं
सगळा सप्लाय आणुनि कुकच्या स्वाधिन तो देऊं
एक वाजतां गाणें सांगूं बंद करायाला
मटण पुरी आणि चुर्मा खाऊं छोटी हजिरीला
चार वाजतां ब्रॅह्मिन लागेल पानें वाढायला
गाणें आटपुनि आपण सगळे बैसूं जेवायला
चटणी, लिंबू, कोशिंबीर आणि सरंगे पुरणाचें
कबाब, खिचडी, घडा, फ्रायफिश, कालवण कोलंबीचें
अशाप्रकारें पंचामृत तें जेवणही जेऊं
सोडा, लिंबू, जिंजर अथवा पिक-मी-अप घेऊं
जेवण जिरण्या करितां थोडी शँपेनही झोकूं
पान तंबाखू खाऊनि पिचक्या पिकदानींत टाकूं
जावा, नोबल्सू, चिरुट्स अथवा सिगार्सही ओढूं
एका दिवसापुरता आपण सर्व ताळ सोडूं
अशा प्रकारें मजा मारूनी संडे नाइटला
हजबंड ट्रेननें निघूनी सगळे येऊं बाँबेला. ॥ १ ॥

(जातो.)

---

**मा०**—( स्वगत ) ए शामराव ने शुं कहीए ? एने सुमार बिलकुल नथी. बस करज काढ्याज करे छे. पण ए सालो आपशे क्यांथी ? मारा हजारएक रुपीया निकलसे. ( विचार करून ) पण ए सालानु लगन थवानुं छे. त्यारे आवशे खरूं तेंनी पासे—कंइ बेत्रण शेर सोनुं तो आवशे. तेवखते गडबड सडबड करीने तेने पासेथी बधुं काढी लेशुं. ते पछी पण हातमाने हातमांज रहेशे. ज्यायछे कां ? निकाल करे तो पन आडनी चिठी तो मारी पासे छेज ने. चालो. ( जातो. )

---

## प्रवेश १० वा.

( **स्थळ**—मुगभाट गल्लीचा नाका. )

**[ सुंदरराव व दलाल भगवानदास. ]**

**सुं०**—( उसासा टाकून ) कां भगवानदास, आपलें काम होण्यापूर्वी आणखी किती ठिकाणीं तरी हिंडावें लागणार ?

**भ०**—सूं कहूं शेट ! आज पंदर बरस थया हूं दलालीनों धंदो करूं छुं पण तमारा काममां जेटली मेहनत पडी तेटली कोई बिजाना काममां पडी नहीं हशे शुं कहीये ! सवारथी तो अत्यारसुधी हुं तमोने पांच छ सावकार पासे लई गयो पण एके ठेकाणे काम थयुं नहीं. आतो मने घणी अचरतनी वात लागे छे.

**सुं०**—नवल कसचें ! माझें दुर्भाग्य ! पण भगवानदास, इतकी मेहनत करून काम पार पडेलना ?

**भ०**—ते विशे तमे बेफिकीर रेहेजो. आ भगवानदासे जे काम हातमां लिधुं ते न थाय तो पछी हुं दलाल सा कामनो ! हवे एटलुं खरूं के तमोने आ काममां थोडुंघणुं पण नुकसान खमवूं पडशे.

**सुं०**—तें कसं काय ?

**भ०**—जुवो शेठ. हुं हमणा तमोने एक मारवाडीनी दुकान पर लई जाऊंछ. तमोतो ये लोकोनो वेवार जाणता हसो. कदाच तमोने अनुभव नही हशे तो पण तमे सांभळयूं हशे के ए लोको व्याजमां मारी नाखे छे. अने कोई कोई वखते एकनूं बमणूं पण लखी आपवूं पडे छे. ते वगर ए मारवाडी लोको पासेथी पैसो मलवो घणो मुशकेल छे.

**सुं०**—तें मला सर्व ऐकून माहित आहे. या मारवाडी लोकांच्या जबरदस्त व्याजानें आमच्या शेंकडो लोकांचा सत्यानाश होऊन गेला आहे. तेव्हां अशा

लोकांच्या हातीं आपण होऊन आपली शेंडी देणें हें मोठें धाडसाचें कृत्य खरें. भगवानदास, मारवाड्याखेरीज इतर सावकार आज मुंबईत थोडे आहेत का ?

**भ०**—शेटजी बीजी जातना सावकार घणाए छे. पण ते लोको पासेथी आंगउदार पैसा मळवा एतो मुशकेलनी वात छे. जुवो. सवारमां हूं तमोने त्रण वाणिया पासे लई गयो हतो पण ते लोकोये शुं कह्युं ! हमो आंगउपर पैसा धीरता नथी. कांइ जनस गीरवी मुकशो तो त्रण शूं पण पांच हजार आपीशुं. तेचप्रमाणें तमारा जातभाई पासे नोतो के लई गयो ? पण तेणें केवो रोकडो जवाब आप्यो ते सांभळयुं के नही ?

**सुं०**—त्याची आतां गोष्ट कशाला ! पण भगवानदास, आपणांस आतां मारवाड्याकडे गेल्याखेरीज दुसरा उपाय नाहींसें दिसतें.

**भ०**—जुवो सुंदरराव, तमोने तो आंगउधार पैसा जोइयेछ. ते तो मारवाडी वगर कोइ बिजो सावकार आपशे येवुं मने लागतूं नथी.

**सुं०**—( उसासा टाकून ) ज्यास मी भीत होतों तेंच कपाळी आलें ! असो ! परमेश्वराची मर्जी ! भगवानदास चला तर. उगीच वेळ कशाला.

**भ०**—(आसपास पाहून) जुवो ते मारवाडीनी दुकान. त्यांहां मारी ओळखाणनो मारवाडी छे. त्यांहां वात काढीने जोइये. पछी तमारा नशीब ! चालो सांभेना रस्ताथी. ( जातात. )

---

## प्रवेश ११ वा.

[ **स्थळ**—मुगभाटची गल्ली–एका मारवाड्याचें दुकान. ]

( मारवाडी चोपडी लिहीत बसला आहे. बाजूस एकदोन गिऱ्हाइकें त्यांत एक मराठा नारायण, त्याची बायको व मुलगी उभी आहेत. )

**ना०**—दादा तेवढा माझा हिशेब नक्की करून टाक कीं. आज किती दिवस झाले तुझे पाठिशीं लागलोंय तरी ! घे तुझे पैसे व तेवढे माझे दागिने परत दे. ही बघ बायकोही बरोबर आली आहे.

**ना० बा०**—होयरे दादा. टाक एकदांचा हिशोब करून. या पोरीनें तिचे दागिन्यांसाठीं माझा जीव खाल्ला आहे.

**ना० मु०**—आई–आई–याचेपाशीं का माझे गोट आहेत ? कशाचे ते आतां

परत मिळणार ! असा हा मोठ्या दाढीमिशीचा बावा कशाचे दागिने परत देणार ! बघ-बघ-केवढाले मोठे डोळे करून मजकडे बघतोय ! बघ.

**ना०**—अग पोरे उगी बैस ! ( मारवाड्यास )-करतोसना बाबा हिशेब ? किती वेळ अजून खोटी करणार ?

**मा०**—( रागानें ) अरे तुमी समदा मिळून काय डोका उठवला माजा तरी ! जा-जा-आज माला फुरसद नाय. सकाळचा ये-अरे तू तरी अवडा डोल कशाचा करते रे ? पैसा देवाला तयार हाय ! दागिना सोडवते काय ? अरे अवडे पंचाइतीमदी कशाला पडते ? ते दागिना तू आज घेऊनशी गेला तर केवडा दिवस तुजेजवळ ठेवशेल ? अरे ते दोनचार महिन्यांमदी पुना येऊन ते पेटीमदी पडलाच समज.

**ना०मु०**—आई-आई-असं कायग हा मारवाडी बोलतो ? खरंच कां ग ? माझे गोट पुन्हा याचे पाशीं अणून घ्यावयाचे का ? अं-अं-मी नाहीं पुन्हा नेऊं देणार ! अं-अं. ( रडूं लागते )

**ना० बा०**—( मुलीची समजूत करून ) अग वेडे तो मस्करी करतोय. एकदां त्याचे पैसे देऊन टाकल्यावर त्याचा तुझे गोटाशीं काय संबंध ! ( नवऱ्यास )— अहो तुमचे बुद्धीला झालं तरी काय ? तो दमबिम सगळा घरांतच का ? हा येवढं बोलतोय पण त्याला एक शब्दही जबाब देववत नाहीं का ? अगदीं गुपचिप ऐकून घेतां ते ? मेला कसकसे बोल बोलतो. ह्मणे दागिने पुन्हां पेटींत येऊन पडतील ! त्याचे बापाचा माल ! पण त्याला बोलून काय उपयोग ! आपलाच दाम खोटा ! एकदां मारवाडी घरांत शिरला व त्याची नजर घरांतले दागिन्यां-वर पडली कीं लागली त्यांनां वाट ! मेल्यानं हळूहळू माझे व या पोरीचे दागिने नेले तेव्हां झाले त्याचे डोळे थंड ! यांचे तरी बुद्धीला भुरळ पाडली आहे कशी ! पाहिजे त्या कागदावर सह्या करून देतात ! सगळं कमावतात ते घालतात मेल्याच्या उरावर-व तेवढंही करून कर्ज आहे तें आहेच ! व घरांतलं सगळं अगदीं बारिक सारिक वस्तूपर्यंत गेलं तें गेलंच ! कशी सळसळीत पार्वती करून टाकली ! ( रडूं लागते. )

**ना० मु०**—आई, कां ग तूं रडतेस ! माझे गोटासाठीं होय ! नको आई ! नसतील मिळत तर जाऊं दे. चल-बाबा दुसरे करून देतील-पण तूं रडूं नकोस. तुला रडतांना पाहिलें ह्मणजे मला रडूं येते ( रडूं लागते. )

**मा०**—अरे ए नारायण–या तुजे बायकोन कवडा ढोंग मांडलाय ! असा रडूनशी हा मारवाडी घाबरेल नाय ! कसाला तूं या लोकाला माजे पेढीवरती घेऊन आला ? लोकाला मजा दावाला ? अने आमचेसारखे अब्रुदार माणसाची अब्रु घेवाला काय ?

**ना०**—जाऊं दे रे, त्यांचेकडे तूं लक्ष देऊं नकोस. तुला त्यांच्याशीं काय करावयाचं आहे–चल–कर आपला हिशेब कर. ( त्याच्या दाढीस हात लावून )–कर दादा हिशेब कर.

**मा०**—बर ! बर ! करते हिशाब ( चोपडी काढून पाटीवर हिशेब करून कांहीं वेळानें )–हे बग मुदील दिडशे रुपाया–ने आठ महिन्यांचा व्याज—

**ना०**—काय म्हणतोस–इतक्यांत आठ महिने कसे ते झाले ?

**मा०**—काय ह्मणते ? आठ महिना कसा झाला ? तुला दिवाळीला पैसा दिला ने ? मोज बगु. कारतक एक. मगसीर–दोन. पोस–तीन. माग–च्यार. फागण–पांच. शिगमा सा होळी–सात. ने गेला मास चेतर. झाला के नाय आठ महिना ?

**ना०**— बरं. ते व्याजाचे किती झाले ?

**ना० बा०**—अहो पण तुमची अक्कल कोठें गेली ? त्याला विचारा फाल्गुन शिगमा न होळी हे तीन निरनिराळे महिने आहेत का ?

**ना०**—अग हो ! खरंच–माझे ध्यानांत नाहीं आलं. कायरे, ही बघ काय सांगते ती.

**मा०**—अरे बायको माणसाला हिसाबाची वारता काय समजते ? आमचे लोकाचा शिरस्ता हाय तसा हिसाब करेल.

**ना० बा०**—आग लागली तुझे शिरस्त्याला ! तुह्मी तरी काय असे बावळटासारखे करतां ? काय रे, तूं नीट हिशेब करणार कीं बोलवूं पोलीसचे शिपायाला ? तूं समजूं नकोस–मी बायको आहें ह्मणून तुला भिऊन जाईन. चल बाळे, आपण शिपायाला घेऊन येऊं– ( जाऊं लागते )

**मा०**—( घाबरून ) अरे कोठें जाते ? सबूर. ते माझी भूल झाली. अरे–भूल झाली. तू सांगते ते खरा ! सा महिन्याचा व्याज झाला. माणूसला भूल होते ! बरा तर मुदील दिडशे रुपया ने सा महिन्याचा व्याज झाला अठरा रुपया–आण एकशे अडसट रुपया—( रुपये घेऊन दागिने काढून देतो. )

**ना०**—( जातांना ) सुटलों एकदाचा याच्या हातून ! देवा ! नको पुन्हां देऊं यांच्या हातीं माझी शेंडी. ( दागिने बायकोस देऊन ) घे बाई तुझे दागिने ! झालीस आतां खुषी ! बघ पाहूं माझेकडे एकदां हंसत्या तोंडानें ! ( जातात )

( सुंदरराव व भगवानदास येतात. )

**मा०**—आवो–शेठीया आवो–बेसो. ( सुंदरराव व भगवानदास बसल्यावर जवळ बसलेल्या पोरास ) अल्या, आ पैसो ले ने बे पैनी पानसुपारी झट लइ आव. ने एक पै पाछी लाव. जो एलाची भुलतो ना हो. ( पोर जाऊं लागतो त्यास ) पांच सात एलाची लावजे हो !

**पोर**—एटलुं बधुं कोण आपसे बे पैमां ?

**मा०**—अरे जा. जेटलुं आपे तेटलुं लई आवने. ( पोर जाऊं लागतो त्यास ) अरे भुली गयो. जरा तामाकु पण लई आवजे हो ! जो पइ पाछी लाववा भुली जशे ! ( पोर जातो. )

**मा०**—केम शेठीआ तमारो शो हुकम छे ?

**सुं०**—माझा मित्र भगवानदास तुला सर्व सांगेल ! भगवानदास सांगा सर्व गोष्ट याला.

**भ०**—आ बाजुपर आवो. वात जरा नाजुक छे. कोय सांभळसे ते सारूं आपणे एक बाजुपर वातो करीए.

**मा०**—वारूं त्यारे चालो पेली कोर ( मारवाडी व दलाल एका बाजूस जातात व कांहीं मसलत केल्यासारखें करून येतात. पोर पानसुपारी घेऊन येतो–ती खाऊन ).

**मा०**—सुंदरराव सेठ, भगवानदासनी माला संमदा समजवला. तुमाला तीन हजार रुपया पायजे. पण ए वखतामदी फकत आंगावर अवडा पैसा कोण कसा धिरेल ? काय दागिना बिगीना–नाय ते पॉलिसी गहाण ठेवेल तर मग बगेल.

**सुं०**—( मनांत ) अरे देवा मजजवळ दागिने असते तर याच्या दुकानीं कां आलों असतों ! ( उघड ) हें पहा, माझ्याजवळ दागिने वैगेरे कांहीं नाहीं. पॉलिसीही काढलेली नाहीं. मला केवळ अंगावर पैसा पाहिजे.

**मा०**—बरा, दागिना नाय ते नाय–पण तुमाला पांच हजारांची पॉलिसी तो काढाला पायजे–अने तेबी आमचे नांवावर करून देवावा लागेल.

**सुं०**—आतां या वयांत पॉलिसी कशी मिळणार? व मिळाली तरी पैसा फारच भरावे लागतील. ते भरून तुझा हपता कसा पोहोंचणार?

**मा०**—ते समदा खरा! पण तसा कराला तो पायजे. त्याचे शिवाय पैसा कोण देल?

**सुं०**—कां भगवानदास-तुम्ही तर अगदीं खातरी दिली होतीत व हा तर असं सांगतो?

**भ०**—हुं सु कहुं सेठ? मे एने घणुं समजाव्युं पण ये नथी सांभळतो. जुवो सुंदरराव. तमारे तो पॉलिसी लेवी पडसेज. तेनी फकर ना करता. मारी ओळखाणनी आफिस छे, त्यांथी हुं तमोने किफायतथीं कढावी अपावीश.

**सुं०**—ठीक तर-( मारवाड्यास ) बरं आहे-तुमच्या म्हणण्याप्रमाणें पॉलिसी काढून देतो. आतां तर हरकत नाहीं. पण पैसे लवकर पाहिजेत. पांचसात दिवसांत पाहिजेत.

**मा०**—भगवानदास-तमे पॉलिसीनुं काम जलदी करावजो. अमारा पैसा तयार छे. ( सुंदररावास ) पण सेठ व्याज हपता वगैरे समदा खबर हायने?

**सुं०**—तें सर्व भगवानदास तुमचे बरोबर नक्की करील. माझे ठिकाणीं तो आहे असें समजून त्याचें बरोबर सगळं कांहीं नक्की करा! कसं काय भगवानदास खरं कीं नाहीं?

**भ०**—अरे हा! ते विशे तमे बेफिकर रहो. चालो-( जातात )

---

## प्रवेश १२ वा.

( **स्थळ**—कांदेवाडीचा रस्ता )

**[ रामराव व विश्वासराव. ]**

**रा०**—( स्वगत ) आनंदरावानें सांगितल्याप्रमाणें सरस्वतीकडे काल गेलों होतों पण ती पुण्यास गेली आहे अशी खबर मिळाली. बरं आज इकडे आलों तो तिला सॅटरडेचेंच एंगेजमेन्ट् आहे. काय करावं—आतां कोणाचे इकडे जावं? आपल्या ओळखीपैकीं आतां एक श्यामी काय ती राहिली. पण ती आपल्या काय उपयोगाची! छः आतां आनंदरावलाच सांगावं कीं तूं पहा बुवा नांय-

किणीबद्दल. आपलं कांहीं जमत नाहीं. चला आतां त्याच्याच घरीं जावं. ( समोर पाहून ) अरेच्चा ! हा आणि इकडे कोठें आला ? छः त्यानें जर कां मला इकडे पाहिलं तर मग मी इकडे कोठें आलों हें विचारल्याशिवाय तो कध्धीं रहावयाचा नाहीं—व जर कां त्याला खरं सांगितलं तर मग काय, इकडेच भररस्त्यावर लेक्चर सुरू व्हावयाचं. म्हणून त्यानें मला पाहिलें नाहीं तोंच त्याची नजर चुकवून आपण त्या बाजूनें निघून जावं हेंच बरं. ( जाऊं लागतो इतक्यांत विश्वासराव पुढें येतो व दोघांची नजरानजर होते. )

वि०—कसं काय रामराव, तूं इकडे कोठें ?

रा०—( मनांत ) पकडलं बुवा एकदाचं. चाणाक्ष खरा ! त्याची सगळेकडे दृष्टी. मी म्हणत होतों सुटलों एकदांचा. पण तो कसला जबरा ! ( उघड ) नाहीं रे, इकडे एकाला भेटण्यास आलों होतों.

वि०—( हंसत ) अरे एकाला म्हणण्यापेक्षां एकीला कां म्हणेसना ? रामराव, तूं मला फसविण्यास पहातोस काय ? अरे मी त्या नाक्यावरून तुला त्या समोरच्या घरांतून उतरतांनां पाहिलें; समजलास.

रा०—( मनांत ) अरेच्चा मुद्देमालासुद्धां पकडला गेलों ! शर्थ आहे याची. आतां याजपासून खरी गोष्ट लपवून ठेवणें ह्मणजे स्वतांची जास्ती फजिती करून घेण्यासारखें होय. सांगावं ह्मणजे झालं. ( उघड ) विश्वासराव, खरंच सांगूं का तुला ? मी तानीला विडा देण्यास आलों होतों.

वि०—हं असं काय ? पण कायरे, तूं हा संभावित धंदा केव्हांपासून करूं लागलास ? सगळी लाजलज्जा गुंडाळून—

रा०— अरे जाऊं देरे ! यांत धंदा कशाचा ? आमची नेक्स्ट् सॅटरडेला पार्टी आहे, तेव्हां एक नायकीण एंगेज करावयाची होती. आणखी काय ? अरे दुसऱ्याला सांगितल्यापेक्षां स्वतांच विडा दिला ह्मणजे सगळ्या रीतीनें फायदा होतो.

वि०—ओयस् ! त्याशिवाय इकडच्या तिकडच्या मिळून दहा पांच पट्ट्या तोंडांत पडतात हा लाभ निराळाच ! व तानीसारख्या संभावित स्त्रियांबरोबर गोड गोड भाषण करण्यास संधी सांपडते हाही अलभ्य लाभ पदरीं पडतो ह्मणावयाचा. खरंच कीं नाहीं ?

**रा०**—तूं ह्मणतोस तसं कां होईना ! बरं तर मी येतों आतां. ( जाऊं लागतो. )

**वि०**—( त्यास अडवून ) अरे पण या पार्टीस नायकीण येणार तेव्हां स्पेशिअल पार्टी आहे ह्मणावयाची. कोणी दिलीबिली आहे कीं काय ?

**रा०**—अरे यस् ! शामरावाने दिली आहे. त्याचं आतां म्यारेज् व्हावयाचं आहे कीं नाहीं ह्मणून. समजलास आतां ? चल जाऊं दे–एक्सक्यूज मी आय् ह्याव् नो टाईम नाऊ.

**वि०**—बरं तर जा. ( रामराव जातो. ) अरे या शामरावनें मांडलं आहे तरी काय ? फारच फास्ट् चालला आहे ! त्याची ऐपत ती काय ? सारी वीस पंचवीस रुपड्यांची चाकरी ! व तो अशा प्लेझरपार्टीज देतो ! हें आहे तरी काय ? व हा एवढा पैसा आणतो तरी कोठून ? छः त्याचं चिन्ह आपल्याला बरं दिसत नाहीं. मी त्याचा स्कूलफ्रेन्ड्. आमची स्कूलमध्यें इतकी फ्रेन्डशिप् होती कीं आह्मांस एकमेकांशिवाय एक घटकाभर चन कसें तें पडत नव्हतें. त्याचा अभ्यास पण त्यावेळीं कसा चालला होता. पण त्याचें तें फर्स्ट म्यारेज् झालं त्या वेळेपासून पडलं अभ्यासावर पाणी. पुढें मग लहानपणींच संसारांत पडल्यामुळें शाळा वगैरे सुटून तो वाईट संगतीस लागला. तरी पण त्याची वाइफ जिवंत होती तोंपर्यंत कसा तरी रीतींत होता; पण त्याची ती वाइफ् वारल्यापासून अगदींच बिघडला ! आतां तर त्याचे ते फ्रेन्ड्स्, क्लब, प्लेझरपार्टीज्, नाचतमाशे यांत सदा निमग्न ! काय चमत्कार आहे. हा शामराव असा निघेल असें माझ्या स्वप्नीं पण नव्हतें ! असो. जरी तो माझी फ्रेन्डशिप् सोडून अशा वाईट संगतीस लागला आहे तरी त्यास दोन गोष्टी सांगून ताळ्यावर आणण्याचा प्रयत्न करणें ही माझी ड्युटी आहे असें मी समजतों.

**या मनीं भरला विषाद । व्यसनीं दंग होत सखा ।**
**वरित सदा अनाचार ॥ धृ० ॥**
**अवनत पथ हा दारुण भुलवित ।**
**रौरव परि अधमाला । दुराचार कुटिल खास ॥ १ ॥**

पहावं तर खरं. आपल्या हातून होईल तितकें करावें. पुढें त्याचें नशीब. चला— ( जातो. )

## प्रवेश १३ वा.

( स्थळ—खंडेरावाचें घर. )

( खंडेराव घरखर्चाचा हिशेब लिहित बसले आहेत. )

**खंडेराव**—( स्वतांशीं ) हं ! अनं दोन आणे बाजाराचे. अवडे पैसे बाजाराला ! इजून कनाय उधळा खरच चालवलय अगदीं ! तिला सांगाला पायजे. स दिडक्याचे वरती एक अरदी नाय खरचाची. थोडा झाला स दिडक्याचा बाजार एक वखताला ? बराबर हाय ! चाकराचे जवळशीं आणाचा. तवं थोडक्यामंदी कसा येते ? पण या पोरांनां अपुण जाऊन आणाला का होते ? सगळं चाकरावरती टाकतांन ते ! बरं ! बाजाराचे दोन आणे अन का ? स आणे वखंदाचे. कोणाचं हें वखंद ? हं. तिचंच. का बोलावं तरी ! पि–पि–पितानं वखंद. पिवाला का होते ! पैसे भरावे लागतांन माला. सांगतय तिला, दवाखान्यांनशी वखंद आणूं नको म्हगुण. यांनां पडशा खोकल्याला घरगुती वखंद नाय का करवे । एक अरदीचा ओला च्या आणला ह्मणजे बस्स ! सगळाच बाजीरावी डौल—

( इतक्यांत सोनाबाई येते. )

**सो०**—एक पावली हाय का जवल ?

**खं०**—( खिसा चाचपून ) नाय. माजेजवळ नोट हाय ती मोडाची नाय. का ? कशाला पायजे ?

**सो०**—नाय. ती वेंयीणबाय आलय न. तिचेसाठीं काय आणवतय—बरफी बिरफी नाय तें का फळं बिळं.

**खं०**—कवडा डौल ! अग अवडा डौल कराला आपले जवळ पैसा नाय ओतून चालला. घरांन काय असेल ते द्या. नायते च्या ते कोठे गेला नायन ?

**सो०**—अहो पण ती वेयीण न ? तिचेसारखा तिला मान नको का कराला ?

**खं०**—केलात मान ! अशे डौल करून भीक मागाल भीक—अन अवडच करून कसं पुरेल ! एक तबक बिबक नाय का पाठवाचं ? पाठवा—पाठवा—वेयीणबाय आलय नं ! मोठं बोलून घेवाला पायजे क नाय ?

**सो०**—( रागानें ) जळळं तें मोठेपण. मोठं बोलून घेवासारखं ते तुमी का करून देता. पण शोभेल तसं केलं पायजे न ? मी का आजच जनामदशीं उठलं नाय.

**खं०**—बरं. बरं. ( पैसे काढून ) या घे चार दिडक्या. अन आणव काय-तरीं, जा.

**सो०**—असा कसा तरी तुमचा जीव पैशाला चोमडा कणाला बा खबर. एक चवली पण नाय का देववे ?

**खं०**—अग, अथ माजेजवळ चवली नाय. जा, तवड्यामदीच आटपा ! ( सोनाबाई जाऊं लागते. ) अग पण सबूर, ही बग एक दिडकी हाय. ही तप-किरीसाठीं ठेवलती. ती घे. आजचा दिवस चालवीन तसंच. घे. झालं आतं ? ( सोनाबाई जाते. )

**खं०**—( पुन्हा हिशेब करीत असतां ) हं. पांच दिडक्या वेयीणबाय आली तिचेसाठीं खरचाला. सगळे मिळून कवडे झाले ? ते—तीन नं ते—दोन—नं ते—स. तीन नं दोन पांच—नं स अकरा—नं या पांच दिडक्या. सवाबारा अ/णे—अ—ब—ब—ब—!

( सोनाबाई व काशीबाई येतात. )

**सो०**—या वेयीणबाय का बोलतांन ते ऐकलं का ?

**खं०**—या, वेयीणबाय या. या, काशीबाय या.

**का०**—आलूंनं.

**खं०**—अग वा ! अग दुदामदी साकर पडली ! अग आमी न ९ राजार-रात होतूं ! इचे बापासचा न माजा ह्मोट्टा घरोबा होता. हिला अवडी धाकलीशी पायलय. अनं आतं ते अगदी वळखवे नाय. अग, इला मी हातावर घेऊन खेळवलय, समजलीस. बरं ते, तुमी बसा. मी जरा जातय भायेर.

**सो०**—भायेर कणाला जाता. तुमचंच काम हाय. रीतबीत कशी का कराची ते विचाराला आल्यांन.

**खं०**—म्हणजे ? आतं विचाराचं का रायलय ? बाळंभटांन नायका सांगितल ? त्याचे जवळ टीप लिवून दिलय. मी माजे हाती लिवली—मी—

**सो०**—हो. पण त्यांच असं सांगणं हाय का सोकरा सोकरी म्होटी हांन तवं

भातक, रुखवत, समजवणी कणाला पायजे. त्यांन पैसा घालाचा त्याचंच दुसरं काय करतींन ते

**खं०**—ते दुसरं बिसरं मगशी कोण करीनाय. उगीच बोलाला मातर. ते काय नाय. सोकरा ह्मोटा झाला ह्मणून त्याचं लगीन निगडवण कराचं का—का ? मग अवडं तरी कशाला ? देवळांन नेऊन सायबासारखं लावून टाकावं लगीन ह्मणजे झालं.

**सो०**—तस नाय. त्यांचे इकडे या वेड्या वेड्या चाली नाय भावत. ह्मगुण सांगून धाडलय.

**खं०**—त्यांनां नसतीन भावत तर त्यांनां सांग तुमचे सोकऱ्याचं लगीन कराल तवं नको घेव भातक बितक. मी नाय कबूल करणार कदी. कदी नाय कबूल करणार !

**सो०**—अहो पण शामाच लगीन झालं नाय का ? आतं भातक बितक कणाला पायजे ! काय कराच हाय ! एक येऊन पडलय तेच धूळ खातय. उगीच त्यांनां खरच अनं आपल्याला ते कामाच नाय. अन ते दोन दोन रुख-वताचे ठाय का कराचे ? माळ्यावरती धूळ खात ठेवाचे क नाय ? जागा मातर अडून जाते. दुसर का !

**खं०**—(रागानें) अग वेडी हायस तूं—वेडी. (काशीबाईस) हें बगा, वेयीणबाय. तुमीं माला हासा का पायजे ते करा. शाणा बोला का वेडा बोला: माझे शामाचं लगीन मी अगदी पैलवरा सारखं करणार. त्यांन अवड पण कमी नाय कराचं. बीजवर झाला ह्मगुण का पाप केलं त्याजून ?

**का०**—तसं नाहीं. त्यांचं ह्मणणं असं कीं उगीच हा निरर्थक खर्च करण्यांत हांशील नाहीं. त्या कांचेचे सामानांत उगीच पैसा कशाला टाकायचा ! तशीच रुखवताचे लाडवाची गोष्ट. निरर्थक तूपसाखरेचा नाश. एवढे पैसे खर्चून लाडू करायचे. पण ते कोणाचे तोडांत तरी जातात का ?

**सो०**—हो खरंच. ते बासे बिशे झाल्यावरती मगशी वाटाचे ! अन तो पण अवडा अवडा तुकडा. कोण तो खाते ? करणाराला मातर खरच होते !

**खं०**—(सोनाबाईस एकीकडे नेऊन) अग हे जिकल्याचे सोळे हो ! ऐकलंस ? मला नाय वाटे का हे आपले शामाला हौशेसारखं करतीन. या भिकारी

डोळ्या वरशींच सोकरीची परीक्षा झाली. बग हो ! नाय ते मग पंचाईत ! मला अगोदरशींच वाटत होतं, पण तूं भुललीसन !

**सो०**—तुमी कनाय लाज आणलीत माला. अगदींचबा माणुसपण नाय तुमाला.

**खं०**—अग माणुसपण माणुसपण कशाचं घेऊन बसलयस ? आपले पोराची आपुण नाय हौस करणार ते मग कोण करील ?

**सो०**—पोराची हौस नाय. तुमचे ह्मातारड्यांची हौस अगोदर !

**खं०**—बरं बरं. तूं जा वेयणीजवळ. मी जातंय भायेर. ( जातां जातां ) ऐकलंतका काशीबाय ? सुंदररावना सांगा का मी आपला जुना म्हातारा हाय. तुंमी नवे मताचे, तवं तुमाला आमच्या जुन्या चाली वेड्या वाटत असतील. पण तुमची सोकरी हाय तवं आमी सांगूं तसं केलंच पायजे. भातक, रुखवत, समजवणी—सगळं केलं पायजे. समजलं ? त्यांन काय पण न्युन नाय पडलं पायजे. नायते मग या खंडेरावाशीं गांठ हाय हं ? ( जातो. )

**सो०**—( काशीबाईस ) बगितलतनं ह्या असा सभाव ? का माझं त्यांचे पुढें चालतंय ? बसा तरी. माझे पाय दुखतान.

**का०**—आतां बसायला वेळ नाहीं. उशीर झाला. बरं तर. त्यांचीच जर मर्जी आहे तर तेथें आमचं काय चालणार ? सांगाल तसं केलं पाहिजे.

**सो०**—हो, का करता ! यांचं सगळे गोष्टीन असंच. चला. तो च्या थंड होतयन !

**का०**—आतां चहाबी कांहीं नको.

**सो०**—आ. असं कसं ! थोडासा पण घेतला पायजेहो. चला वरती.

( जातात ).

---

## प्रवेश १४ वा.

( **स्थळ**—सुंदररावाचें घर. )

( **बेनाबाई व तिच्या मैत्रिणी—कमळाबाई—पिरोजबाई—शिरीनबाई—हिराबाई—चंपुबाई इ०** )

**बे०**—तुह्मी बाई सगळ्या आल्यात परंतु अजून कमळु कां आली नाहीं हें

समजत नाहीं ! गडी पाठविला तेव्हां तुझ्या पाठीमागें मी येतें म्हणून सांगून धाडलं. बारा वाजायला झाले तरी कां बरं अजून येत नाहीं ?

पि०—ती तशीच आहे. भारीच बाई तिचा कारभार थंडा.

शि०—तसं नाहींग. आदितवारचा दिवस. सगळे पुरुष घरांमध्यें आले पाहिजेत ! कारभार तर आटोपला पाहिजेना ? तिच्याजवळ रांधप आहे. तो टाकून तर यावयाचं नाहीं !

पि०—तें पण खरंच. मीच पहाना–किती लवकर यावयाचा बेत केला होता पण आटपतां आटपतां अकरा वाजून गेले. आदितवार असला ह्मणजे आमचे घरांतल्या पुरुषांना काय वाटतं कोणाला ठाऊक ? लवकर आटोपतं घ्यावयाचंच नाहीं.

हि०—खरंच बाई ! आदितवारच्या दिवशीं जेवायला दोन तीन न वाजले तर आदितवार गाजवला नाहीं–असंच त्यांना वाटतं.

चं०—त्यांत त्यांचा तरी बांक काय ! आठा दिवसांत एक दिवस मिळणार. दररोज धांदल आहेच. एक दिवस तर निसुराईनें घ्यावा, असं, दुसरं काय !

हि०—तूं कांहीं ह्मण, पण मला बाई या गोष्टीची मोठी चीड येते. आमचे येथें तर या आदितवारचं मोठं बंड आहे. सगळे बाहेर भटकून भटकून बारा एक वाजल्याशिवाय घरांत यावयाचेच नाहींत. आणि त्यांत आमचे मोठे दिरोजी तर बोलूंच नका. सगळे गांवभर भीक मागायची–आणि घरांतल्या दुसऱ्या मंडळीला उगीच तिष्ठत ठेवायचं ! त्यापेक्षां जेवण आटपून मग पाहिजे तर भटकावं. सगळा दिवस आहे तुमचा. पण तें नाहीं. एक दोन वाजतां यायचं–मग आंघोळी नी हें न तें–आमचा कारभार आटपतां आटपतां चार वाजतात. बरं, हा कारभार आटपला नाहीं तों झाली सांज ! पुन्हां संध्याकाळच्या तयारीस लागलं पाहिजे. मला बाई ती दररोजची धांदल पतकरते पण तो आदितवार नको नकोसा होतो.

बे०—पण कांग ? हे दोन तीन वाजेपर्यंत जेवीत नाहींत तर काय तोंपर्यंत उपाशींच असतात ?

हि०—त्यांना कशाला उपाशीं राह्यला पाहिजे ? दोन चार ठिकाणीं काफीचे कप मारले म्हणजे झालं. नाहींतर इराण्याचीं दुकानं तर कोठें गेलीं नाहींतना ?

(काशीबाई येते.)

**का०**—कांग बेनु–आल्या का सगळ्या सवाशिणी?

**बे०**—आई, एक कमलुशिवाय बाकी साऱ्या आल्या. तिला बोलवायला पुन्हां गड्याला पाठवूं का?

**का०**—नको. येईल ती. ते पण कोठें अजून बाहेरून आले आहेत. बरं तर तुह्मी इकडेच बसा. मला त्या भटाजवळ बसलं पाहिजे–दीड रुपया रोजीचा कबूल करूनही मेला भट असा मिळाला आहे कीं त्याला सगळं सांगेन तेव्हां तो करणार!

( जाते ).

**शि०**—बेनु, जातांनां तुझी आई भटाविषयीं काय बोलली तें तूं ऐकलंसना? खरंच. या रांधपी भटांचं कीं नाहीं अलीकडे फार बंड माजलं आहे!

**हि०**—हो, पण त्याला कारण आपणच!

**शि०**—तें कसं ग!

**हि०**—कसं तें सांगू का? अग आपल्या बायका दिवसेंदिवस होत चालल्या पोस्ती–त्यांनां चुलीजवळ नको काम करायला! चांगले चांगले इष्कीचे पोशाग घालून मिरवायला मिळालं म्हणजे झालं. ते मोतीरामचेकडले लेसीचे पोलके घालून मिरवायला कसं मिळणार चुलीजवळ गेलं तर! आपल्या बायकांनीं हें काम सोडून दिलं ही कांहीं सुधारणा झाली असं समजूं नये. बायकांच्या खऱ्या भूषणांपैकीं–स्वयंपाक चांगला करतां येणें हें एक भूषण आहे. अलीकडे लग्नकारणांत निवशी जेवणं होतात त्याचं खरं कारण पहायला गेलं तर हें कीं आपल्या बायकांत आतां चांगल्या स्वयंपाक करणाऱ्या फार थोड्या आढळतात. हें आपल्या स्त्रीजातीस एक लांछन आहे.

**बे०**—हिरु ह्मणते हें खरंच आहे. आपल्या बायकांस स्वयंपाक करणें हें हलकें काम आहे असें वाटूं लागलें आहे. पण त्यांत हलकेपणा कांहींच नाहीं. या भटांस आपल्याच जातीन फार लाडावलें आहे. दहा रुपये खाऊन पिऊन पगार–शिवाय रोज्या करण्याची सूट–अशा सुटी देऊन आपण त्यांना फारच पेजविलें आहे.

**चं०**—व खरं पाहिलं असतां त्यांच्यापासून फायदा न होतां उलट सर्व तऱ्हेनें नुकसानच होतें.

**हि०**—व ह्मणूनच आमचे एथें आम्हीं पाळीपाळीनें स्वयंपाक करायचं बांधून घेतलं आहे. व भट ह्मणून कधीं ठेवायचा नाहीं असा निश्चय करून टाकला

आहे. आह्मी चौघीजणी धडधाकट जावा असून भटाचा उगीच वीस रुपयांचा खर्च कशाला पाहिजे !

**बे०**—व असा सगळ्यांनीं निश्चय केल्यावर हें एक मोठें बंड मोडून जाईल यांत संशय नाहीं. ( इतक्यांत कमळाबाई घाईघाईनें येते. )

**क०**—[ शाल काढून ठेवून ] कां ग बेनू, माझी खोटी झाली का ? मला वाटत होतं कीं तुमचं आटपून पण गेलं असेल.

**बे०**—नाहीं ग ! अजून बराच वेळ आहे. पण तुला एवढा ग वेळ कां झाला ?

**क०**—काय करूं ! सासुबाईच्या हातांतून सुटेन तेव्हां ना ?

**पि०**—सासुबाईचं उगीच नांव आपलं. ते सोडतील तेव्हां ना ? आज आदितवारचे घरीं असतील ना ?

**क०**—हं ! हं ! ठीकच आहे. तुझ्या स्वतांच्या अनुभवावरून तूं ह्मणतेस !

**पि०**—हो बाई आमचे इथें मी घटकाभर जवळ नसलें ह्मणजे चैन पडत नाहीं. दोन दिवसांवर माहेरीं राहिले कीं आला गडी बोलवायला.

**चं०**—अं ! त्यांत काय मोठें नवल ! आमचेकडे पण तसंच. परंतु माहेरीं रहाण्यासंबंधानें मी नाहीं ऐकायची हो ! साफ सांगून ठेवलंय कीं तुह्मांला चैन नाहीं पडलं तर खुशाल या तेथें.

**हि०**—हो न येतील तर काय करतील. सासूचं डबोलं मिळायचं आहेना ! तेव्हां मर्जी संभाळली पाहिजेच

**पि०**—बरं तें असो. पण कांग कमलु तुझी सासू इतकी का द्वाड आहे ?

**क०**—तें बाई बोलूंच नको. काय तें त्यांचं सोवळं नी ओवळं ! त्यांनां बुकं वाचलेलीं नाहीं चालायचीं. त्यांचे समोर परक्या माणसांबरोबर बोलेल कोण ? मेलं माळ्याला बोलवायाचं असलं तें देखील आम्हीं बोलावलेलं खपत नाहीं.

**पि०**—अग इतकी जर ती कडक आहे तर मग तुझे नणंदेचे ग चाळे कसे आवडतात तिला ?

**क०**—तीच तर गमंत. माझे माहेरीं कधीं त्यांचं येणं झालं तर ' चालले म्हैसी पाठी टोणगे ' असं म्हणायचं. न स्वतांचे जांवई दररोज दोन तास येऊन बसतात तें सगळं चालतं. मग त्यांनां चांगलं चांगलं खायाचं करून देतील, चहा काफ्या देतील. बरोबरच आहे. तें पडलं आपलं.

पि०—खरंच. मी कीं नाहीं केव्हां केव्हां माहेरीं जातें—पण कधीं माहेरीं रहायाला गेलें कीं सुटलं आमचे सासूचं तोंड. यांनां माहेरींच रहायला पाहिजे. घराची परवाच नाहीं. पण स्वतांच्या मुली महिनेनमहिने राहतात त्याचं कांहीं नाहीं.

क०—आमचेकडे तसला कांहीं त्रास नाहीं. परंतु आमच्या सासूबाई भारीच बाई टिकाखोर. कशाला म्हणजे नांव ठेवलं नाहीं असं नाहीं. या काय पायघोळच नेसतात. कुंकूं काय टिकलीसारखंच लावतात. शेंडा वरतीच काय घेतला. चोळी तोकडीच काय घातली. भांग आडवाच काय केला ! अशी सारा दिवस टिका चालायची. पण अती झालं ह्मणजे मग कोण जुमानीत नाहीं. ठेवतों आम्हीं तशाच बोलत. मीं कांहीं तरी ऐकतें पण आमच्या मोठ्या जाऊबाई मुद्दाम त्यांनां आवडत नाहीं तसंच करतात.

शि०—अग बेनु तूं संभाळ बरं. तुझे सासूचीं पण गाऱ्हाणीं ऐकण्यांत येतात हं ! तुझी मोठी जाऊ आहे कीं नाहीं तिच्याशीं एक घडीभरही तिचं जमत नाहीं ह्मणून ऐकतों.

बे०—असेल. त्याचं आपल्याला काय ? सासूचीं गाऱ्हाणीं ऐका किंवा सुनेचीं गाऱ्हाणीं ऐका, मला एवढं समजतं कीं दोन हातांशिवाय टाळी काय वाजत नाहीं. सासवा ह्मणजे झाडून द्वाड व सुना तेवढ्या सालस असें मी कधीं मानणार नाहीं.

शि०—बरं बरं समजेल आतां. हातच्या कांकणाला आरसा नको. मात्र तूंच आम्हांला सासूचीं गाऱ्हाणीं सांगूं नको ह्मणजे झालं !

( इतक्यांत आंतून जेवणाची तयारी झाल्याची वर्दी येते. बेनाबाई व तिच्या मैत्रिणी आंत जातात )

---

## प्रवेश १५ वा.

( स्थळ —सुंदररावाचें घर ).

( सुंदररावाचे मुलीचे लग्न होऊन कन्यादानाचा विधि उरकून घरासमोरील मंडपांत बाळंभट व नरहरीभट उपाध्ये बसले आहेत. मंडपांत व घरांत लग्नाचे दिवसाची सगळी गडबड वगैरे चालली आहे. )

**बा०**—झालं एकदांच लग्न उरकलं. हें लग्न जुळविण्याच्या कामांत फार बुवा त्रास पडला ! असो ! नीट पार पडलं ह्यांत आनंद ! पण नरहरभटजी काय चमत्कार आहे पहा ! या लोकांनीं नाचतमाशांत व डामडौलांत मारे शेकडों रुपयांचा फडशा उडविला पण सुवर्णाभिषेकाच्या दक्षणेच्या वेळीं पाहिलींतना मजा ! ह्मणे पाणी सोडा दक्षणेबद्दल ! आतां ही दक्षणा कसची मिळते ! ही अशी आमची मेहनत फुकट घालविली ह्मणजे यजमानाचं कल्याण तें कसं होणार !

**न०**—तुह्मांला कीं नाहीं बाळंभट ही अगदीं वाईट खोड लागून गेली आहे ! लग्नासारख्या प्रसंगीं आणखी हे अपशब्द ! जाऊं द्या ! हें जरी त्यांनीं ठीक केलं नाहीं तरी आपण होऊन असं कशाला बोलावं !

( इतक्यांत सुंदरराव येतात. )

**सुं०**—काय हो नरहरभटजी, तुमचे यजमान कोठें गेले ?

**न०**—दादाजी घरीं फराळाला गेले आहेत, आतां येतों ह्मणाले.

**सुं०**—साडे बिडे आजच उरकायचे ना ?

**न०**—काय समजत नाहीं बरोबर. दादीबाईचा तसा विचार दिसतो खरा ! पण दादाजी काय ह्मणतात तें पहावं.

**सुं०**—बरं तर मी आंत जातों. दादाजी आले कीं मला बोलवा—

( सुंदरराव जातात. )

**म०**—कायहो बाळंभट ! भूयसी दक्षणेचं कसं काय ? आमच्या यजमानांनीं तर सगळा एक रुपया दिला आहे. तेव्हां अर्थातच तुमच्याकडून अर्धा रुपया येणार. मिळून दीड रुपया होणार. आणि ब्राह्मणांची गर्दी तर फार दिसते. आज गांवांत लग्नं नाहींत फारसीं तेव्हां सारेच येथें लोटले.

**बा०**—हो असं तर खरंच ! अहो पैसा पैसा दिला तरी चटणीसारखा दीड रुपया केव्हांच उडून जाईल ! नरहरभटजी, तुह्मी सर्वांना दक्षणा वांटण्याच्या भानगडींत पडतां कशाला ! तुमच्या आमच्या ओळखीच्या अशा दोघां चौघांच्या हातास दोन दोन पैसे लावून ‘ दक्षणा झाली—झाली ’ ह्मणून बाकीच्यांस वाटेस लावूं व राहिलेले पैसे आपण दोघेजण निम्मेनिम्मे वांटून घेऊं ह्मणजे झालं—त्यांत तुमचेंही काम होईल व माझेंही काम होईल.

**न०**—ठीक! ठीक! युक्ती तर नामी काढलीस! असंच तर! अहो त्यांनां दिली तरी ब्राह्मणांस जाणार व आपण ठेविली तरी ब्राह्मणांसच मिळणार, एकून एकच; कोठें अनाठायीं जात नाहीं! हं, हाच बेत उत्तम! ( खंडेराव येतात )

**खं०**—( धादलीनें ) काय भटजी तुम्ही इकडे गोष्टी करीत बसलेतका? वा! अहो मदी जाऊन सगळी आटपाआटप करा! वरात किती वाजतां काढाची-अन कांहो त्या भट्टांनां भायेर जमवून ठेवलेत कशाला? त्यांना अजून दक्षणा दिली नाय?

**बा०**—( गडबडीनें ) हो—नाहीं—देतों—

**खं०**—आणा पाहूं इकडे कोठें पैसे हायत ते. नरहरभटजी, तुम्ही आंतमदी घाय करा—मी न बाळंभटजी वांटतो दक्षणा. ( नरहरभटजी आंत जातात. )

**बा०**—( मनांत ) हें पहा ल्चांड! मी समजत होतों कीं दक्षणेचे पैसे जिरले. पण म्हातारा कसचे जिरूं देतो!

**खं०**—हं बाळंभट इकडे उभे का रायलेत? चला पुढें व्हा—वांटाला लागा दक्षणा—हं. चला पाय उचला. ( बाळंभट जातात. )

( सुंदरराव येतात. )

**सुं०**—कां दादाजी साडे आजच उरकायचे ना?

**खं०**—का बाबा तुमाला सगळे गोष्टीची घाय! काय नाय, घाय नको कराला. होतील सावकास समजवणीनंतर. पण तुमी नवरानवरीला शिणगाराची घाय करा! नायते सभापूजनाला उगीच खोटी होयल. का रात होते का का! चला मी पण येतय— ( जातात ).

( सभापूजनाचा थाट. मंडळी बसली आहे. नाच सुरू आहे. )

**खं०**—( सुंदररावास एके बाजूस नेऊन रागानें ) कायहो, ही कोटचे गांवची रीत?

**सुं०**—कां? काय झालं?

**खं०**—( सभेकडे बोट करून ) तीं बगा सगळी पोरं तक्यासी टेंकून बसल्यान! न आमचे सारखे म्हाताऱ्यांनीं कोठें बसाच? हं? इकडे जोड्याजवळ? नायते का नायकिणीचे पायाशी? हं?

( सुंदरराव मुलांस बाजूस करितात. खंडेराव मध्यें जाऊन बसतात व तेथूनच )

**खं०**—अरे धाकलाबाय–तूं जा त्या नवरानवरीला शिणगारल का नाय ते बग–जा. उगीच वेळ होते. रात झाली–बारा वाजाची पास हाय न !

( धाकलाभाई जातो )

**खं०**—अरे वामन, हिलालवाल्यांनां हिलाली पेटवाला सांग—कसेरे—सगळं तुमांला सांगाला पायजे ! आंगची अक्कल बिलकूल नाय ! अन त्या ताशेवाल्यांना ताशे शेकाला सांगा–चला घाय करा.

( नवरानवरीस घेऊन येतात. व सभापूजन झाल्यावर नवरानवरीस गाडींत बसावयास घेऊन जातात. )

[ अंक १ ला समाप्त ]

---

# अंक २ रा.

## प्रवेश १ ला.

( **स्थळ**—खंडेरावाचें घर. शामरावाची खोली. )

( बेनाबाई खोलींत पुस्तक वाचीत बसली आहे. )

**बेनाबाई**—( कांहींवेळ वाचल्यानंतर ) काय मेलं करावं ! दररोज दोन दोन तीनं तीन वाजेपर्यंत बाहेर भटकायचं होत असतं. घरांत म्हणजे चित्तच नाहीं ! हातावर पाणी पडलं कीं चढले कपडे ! आज काय साहेबाच्या बंगल्यावर जायचं आहे. उद्यां काय इपिसाच्या कामाला जायचं आहे. याप्रमाणें दररोज कांहीं ना कांहीं सबब आहेच. पण मेला त्यांत एवढासा खरेपणा असेल तर शपथ. जुगाराच्या अड्ड्यांत व त्या मेल्यांच्या—नको त्या मेल्यांचें नांव ! आग लागो त्यांच्या नांवाना ! त्यांच्यांत रात्री घालायच्या असतात ! लग्न नांवाला मात्र करायचं. एकदां लग्न झालं म्हणजे मग बायकोचें कांहीं का होईना ! मेलं घरांत मरमर काम करावं आणि पडावं ! असो, मेला बायकांचा धर्मच आहे काम करण्याचा. पण त्याप्रमाणें धन्याचं सुख तरी ? तेंही नाहीं ! बरं, धन्याचं सुख नाहीं तर नाहीं; पण घरांतल्या माणसांपासून तरी सुख ? सासुबाई व दादाजी हेही तसेच ! अहो फळावरून झाडाची परीक्षा ! चांगल्या झाडास असलीं घाणेरडीं फळें येतील काय ? मेलं मरेपावेतों काम करावं पण एक चांगला शब्द तरी आहे का ! पण तेंच कुठेंसं दुपारचं कामबिम आटपून पुस्तक घेऊन बसलं कीं आला तडाका ! सध्यांच्या पोरींनां काम करायला नको ! पुस्तकं वाचायला पाहिजेत. जरा कोठेंसं आंग टेकलं कीं आल्या उठवायला. मी खरं सांगतें सासुरवास बरा असला तर चांगला, नाहीं तर नसलेला पतकरला !

### पद.

**सुखमय हा व्हावा । सहवास पतिरत मज सदा अ.ल ॥ धृ० ॥**
**परि दे विधि ना आश्रय मजला । सुखविरहित जगीं जन्म हा ॥ १ ॥**

असें जर थोड्या दिवसांच्या अनुभवावरून मला वाटतें, तर भांडखोर व द्वाड सासवांच्या हाताखालीं नांदण्याचें ज्यांच्या दैवीं आलें असेल त्यांच्या मनाची

स्थिति काय होत असेल बरं? असो, पण अशांचे नवरे तरी चांगले असतील व त्यामुळें त्यांनां एवढें दुःख नसेल होत; पण माझ्या कपाळीं तें देखील नाहीं. हो, सासू द्वाड असली तरी धन्याचं पाठबळ असलं ह्मणजे तेवढा त्रास होत नाहीं! अहा! मला तर धन्याचं पाठबळ ह्मणजे केवढं? पाठबळ नाहीं तर नाहीं, प्रीतीचे दोन शब्द तरी. छेः ते बोलण्यास फुरसद कोठें आहे? झाले, आतां तीन वाजायला झाले. आतां येतील आणि तसेच निजतील! मग काय गोड शब्दांचा सुकाळ! आणि जर कां स्वारी रंगून आली असली तर मग काय विचारायला पाहिजे! मजान् मजा! ( इतक्यांत बाहेरून शामराव दार ठोकतो.)

**शा०**—अग ए. अग दार उघड. दार–उ–घड.

**बे०**—झालं यायचं. मला वाटतं आज स्वारी रंगली आहे! हर! हर! देवा! ( दार उघडावयास जाते. )

**शा०**—( आंत येऊन ) कां आज तुला दार उघडायला उ–उ–उशीर कां लागला?

**बे०**—उशीर तो कसचा झाला! तुह्मीं एक हांक मारलीत न् मीं दार उघडलें.

**शा०**—लबाड आहेस तूं! लुच्ची कोठची! मला दोन तास बाहेर उभा ठेवून दुसरी अधिक लाहेरी करतेस! लाथ मारीन, तों–तों–तोंड फोडीन–तुला शरम नाहीं वाटत! तूं आंत गरम गरम नरम नरम बिछान्यावर लोळावंस आणि मी बाहेर थंडींत कुडकुडावं हं.

**बे०** —अग बाई. एवढी थंडी ती कोठें आहे तरी? गर्मीनें तर जिवाची लाही लाही होत आहे. बरं पण तें असो, आतां झोंप घ्यायची ना?

**शा०**—काय? झोंप! छः इकडे बघ माझ्या मनांत कीं नाहीं आज. मोठी मजा करायची आहे. व त्यासाठीं इकडे बघ मी सकाळींच बाटल्या आणून ठेवल्या आहेत. या पहा तुला दाखवितो. ( कपाटांतून एक बाटली व दोन ग्लासें काढतो. ) ये आपण आज मोठी मजा करूं हं! समजलीस ना?

**बे०**—कां घेतलीत तेवढी पुरी झाली नाहीं वाटतें? चला, निजा आतां—

**शा०**—मी...मी...कध्धीं निजणार...ना...नाहीं. तुला दारू पाजीन. म...मग निजेन...बोल बोल तूं बऱ्या बो–बोलानं पिणार का—

**बे०**—मी साफ सांगतें कीं हें असलं मला कधीं चालणार नाहीं. काय मेला चमत्कार ! आपण पितां तर पितां आणखी मला प्यायला सांगतां !

**शा०**—मग त्यांत चमत्कार तो क–क–शाचा ? पुरुषांनींच दारू प्यावी आणि बा–बा–यकांनीं पिऊं नये असें कोणत्या शा–शा–शास्त्रांत सा–सा–सांगितलें आहे ? बो–बोल. नाहीं, तुला प्यालीच पाहिजे. मा–मा–झा निश्चय झाला आहे. तुला ती पाजल्याशिवाय मी रहाणार नाहीं. बेअक्कल कुठची. दारू प्याल्यानें किती नफा होतो हें तुला ठाऊक कुठें आहे ! साहेबलोकांच्या बायका दा–दा–दारू पितात तेव्हां त्यांच्या गालांतोंडावर इतकी ला–ली–ला–ली असते. आणि हें बघ तुझे गाल. कसे फि–फि–फिक्के पडले आहेत ते ! म्हणून सांगतों. चल घे–घे–घे जराशी. ( ग्लास तिला देऊं लागतो ती ग्लास उडवून टाकते. )

**शा०**—हं–हं–हें का–का–य. के–लेंस तूं ? अं–माझी दारू हो–हो-ळलीस...

**बे०**—(रागानें) हेंच काय पण यापेक्षांही जास्ती करीन. छाकट कोठले ! मेली लाज तर एकीकडेसच गेली आणखी ही अरेरावी ! मला नाहीं हें असं चालायचं. मी आपली माहेरीं निघून जातें. आतां स्वस्थ निजतां का उठवूं दादाजींना ?

**शा०**—अं–नको. नको–तसें नको ग करूं. हा ! हा ! (हंसतो.) दादाजींना सा–सां–गतेस ? हा ! हा ! एक वेळ सोडून श–श–शंभर वेळ सांग न–भितय कोण ? पण थांब. नको–आणखी दोन दिवस थांब. मी तुझे–पा–पा–पायां पडतों–नाहीं–तर–जा–जा सांग–मी काय केलंय ? मी काय छा–छा–छा–कटा नाहीं. बस–छाकटा आहें मी. सांग–पण नको–जरा थांब ! असं का–का–काय करतेस ग ?

**बे०**—बरं बरं तोंड संभाळा. निजा आतां—

**शा०**—हं निजूं तर ? तूं ना–नाहीं निजत ? बरं नको निजूं तूं. मी आपला निजतों. पण नाहीं, तूं पण निज.

**बे०**—कां आतां मुकाट्यानें निजतां कीं हांक मारूं दादाजींना ?

**शा०**—हं नको–नको–मी आपला निजतों. ( बिछान्यावर पडतो. ) आहा हा ! दारूकी क्या मजा है ! मै तो अस्मानमें जाता हुं. ( निजतो. )

**बे०**—( उसासा टाकून. ) आहे कीं नाहीं मजा ! कुंवारपण मात्र गेलं पण संसारसुख केवढं पदरीं पडलं हें ! असो, ईश्वराची मर्जी. चला, आतां आपणही

येथें हाथरीवर अमळ पडावें. सकाळीं पुन्हां पांच वाजतां उठायचं आहेच! नाहींतर सासुबाई म्हणतील, झाल्या उठवळ, लवकर उठवत दिखील नाहीं. त्यांना हे आंतले प्रकार कोठून माहित असणार?

( पडदा पडतो. )

---

## प्रवेश २ रा.

( स्थळः—खंडेरावाचें घर-धाकलाभाईची खोली. )

( धाकलाभाई खोलींत वाचीत वसला आहे. )

धा०—( पुस्तक बंद करून ) पुरे! आज पुष्कळ झालें. उद्यां हॉलिडे आहे. कांहीं हरकत नाहीं. ( पुस्तक एका बाजूस ठेवून ) पण या गोष्टीचा काय बरें विचार करावा? दादाजींनीं तर अगदींच पाठ पुरविली आहे. दादींचाही तसाच तगादा लागला आहे. काय करावं हें समजत नाहीं. या लोकांना अगदीं अक्कल नाहीं. त्यांना वाटतं कीं लग्न झालं म्हणजे जन्माचं सार्थक झालं. लग्न ह्मणजे त्यांना बाहुलाबाहुलीचा खेळ वाटतो. वरं तें असो. त्यांच्या आयडियाज्प्रमाणें त्यांना तसें वाटो. परंतु व्हाट् डु दे मीन् बाय् फोरसिंग ए वाइफ् अपॉन् मी? आतां मी कांहीं लहान नाहीं. मला बरं वाईट सगळं समजतं. व्हाय् डोंट् दे लीव्ह मी टु च्यूझ माय् ओन् वाइफ्. हं! खरोखर आपल्या लोकांत ही एक अगदीं वाईट चाल पडली आहे. आपल्या जन्माची जी पार्टनर व्हावयाची ती आपण न पसंत करतां चमत्कारिक विचार ज्यांचे डोक्यांत भरून गेले आहेत असे ओल्ड् पिपल् आपल्याकरितां पसंत करणार व जिचें आम्हीं कधीं तोंडही पाहिलें नसेल तिची व आमची जन्माची गांठ बांधून टाकणार! मग ती आपणांस लाइक् होवो किंवा न होवो! आपणांस ॲक्सेप्ट् केलीच पाहिजे. नो! नो! मला ही गोष्ट कधींच कबूल व्हावयाची नाहीं. दोझ् ओल्ड् टाईम्स आर् गॉन्. आम्ही जें एवढें एज्युकेशन् घेतलें त्याचा खरा उपयोग करण्याची वेळ हीच आहे. नाहींतर मग त्या एज्युकेशन्चा काय उपयोग! ( समोर पाहून ) हीः पहा दादी येथेंच येत आहे. त्याचबद्दल विचारायला येत असेल. हं येऊं द्या.

( सोनाबाई येते. )

**सो०**—धाकलाभाय मग तें यादवन ठेवाचं न ! ते उपाध्ये विचाराला आल्यान त्यानां काय सांगाच ?

**धा०**—दादी, हें पहा मी आतां त्याच गोष्टीचा विचार करीत होतों.

**सो०**—मग झाला का विचार यादवन ठेवाचा ?

**धा०**—पण हें पहा दादी तुह्मांला या गोष्टीची इतकी ती घाई कशाची झाली आहे ? मी कांहीं ह्मातारा नाहीं झालों—यंदा नाहीं पुढचे वर्षी—लग्न करणें तर आहेच.

**सो०**—तसं नायरे. त्यांचा जीव हाय तवं तुझं एकदाच लगीन झालं ह्मणजे मग आमचा जीव निसूर झाला. त्यांचा का नेम हाय !

**धा०**—काय ह्मणतेस दादी ! तूं देखील दादाजीसारखीच झालीस ? मला वाटत होतं तुला जास्त समज असेल ह्मणून. पण तुह्मी दोघींही सारखींच.

**सो०**—अरे आमी तुझे वाईटाची का गोष्ट सांगतों ? (रागानें) आमांला तुझं बरं नायका समजे ?

**धा०**—दादी तूं अशी उगीच कां बरं माझ्यावर रागावतेस ? हें पहा, तुमच्या मनांत माझं बरं व्हावं हेंच आहे. व तुझी ही सर्व खटपट त्याचसाठीं चालली आहे या विषयीं माझे मनांत तिळमात्रही संशय नाहीं. परंतु तूंच पहा. जी गोष्ट तुह्मी माझ्या सुखाकरितां ह्मणून करणार त्या गोष्टीनें मला खरोखरीच सुख न होतां जर दुःख होत असेल तर अशी गोष्ट करण्यांत तुह्मांला फायदा तो कोणता सांग बरं ?

**सो०**—अरे पण यापासून तुला दुख तें कस होणार ?

**धा०**—हं, अशी शहाण्यासारखी मला विचार. मी त्याचा तुला जबाब देतों. ( मनांत ) आतां इच्याशीं जरा वकिली लढविली पाहिजे. ( उघड ) बघ, लग्नाचा उद्देश कोणता ?

**सो०**—मला बा नाय समजे उद्देश बिद्देश काते. तूं आपला साध बोल. मी कोठें शिकाला गेलतु तुजेसारखी.

**धा०**—( हंसत ) हं ! हं ! तसं होऊं दे—अगदीं साधं बोलतों. लग्न करायचं कशाला ?

**सो०**—संसारासाठीं ! दुसरं कशाला ? ह्मातारपणीं बायको पोरं हातापायाला पायजेत न ?

**धा०**—ठीक. असं खरंना ? सध्यां तर माझे हातपाय मोडले नाहींत ना ? तशांत तुह्मीं जोपर्यंत माझ्या माथ्यावर आहांत तोंपर्यंत या गोष्टीची मला काळजी कशाला पाहिजे ? पुढचं पुढें—पाहतच आहों.

**सो०**—अरे पण आमी तुझे जनमाला पुरणार का ?

**धा०**—जन्माला जरी नाहीं तरी पांच दहा वर्षे तर हरकत नाहीं. आणि हें पहा दादी, लोकांचे मुलगे कोणी बॅरिस्टर होतात, कोणी एम्. ए. होतात, तसं कांहीं मी व्हायला नको का ? झालं, पुढल्या वर्षी बी. ए. झालों म्हणजे झालं ? एकादा स्वतंत्र धंदा नको का करायला ? एवढी विद्या शिकून वीस पंचवीस रुपड्यांची एकाद्या शाळेच्या मास्तरची किंवा दुसरी हलकी चाकरी करायची काय? आणखी मी जर ब्यॅरिस्टर झालों किंवा एम्. डी. झालों किंवा मला एखादा मोठा हुद्दा मिळाला तर त्याचें भूषण मला एकट्यालाच का ? तुला नाहीं का ? अग तुमच्या बायकांत तुझ्याकडे बोट करून कोणी असं ह्मणणार नाहीं का—ही पहा ती अमक्याची आई ? मग तो मान कोणाला ? बोल—बोल पाहूं ?

**सो०**—हो, मान नाय कसा ? माला त्या दोघांनीं खालीं बगाला लावलय—पण तुजेमुळें हाय नाक वरती थोडसं !

**धा०**—(मनांत.) द्याटस् राईट्. द्याट्स् हर उइक् पॉइंट. (उघड) तर मग हें माझें लग्न करून त्यांत अडचण कां आणतां ? मी लग्न नाहीं करायचं का ह्मणतों ? करायचं. पण माझं एवढंच ह्मणणं आहे कीं माझा अभ्यास पुरा होऊं द्या. मग लग्नाची गोष्ट. लग्न एकदाचं झालं ह्मणजे मग—हें—सगळं अर्धवटच राहणार. तशांतून तुमची ह्मणजे लग्नाची हौस पुरली नाहीं असें नाहीं. दादाचं झालं—शामाचं एक नाहीं तर दोन लग्नें झालीं—शांतेचं झालं—थोडीं कां लग्नं झालीं ? पहा, दादी मी सांगतों त्याचा नीट विचार कर. तूं शहाणी आहेस. आज तुझ्यासारखी आई मिळणं कठीण ! तूं घाल दादाजींची समजूत कशी तरी—

**सो०**—ते नाय बा माला कबूल. ते अगोदरच बोलतांन का मी तुला फुस देतय. त्यांना तूच का ते सांग. मी इकडे पण नाय बोलाची न तिकडे पण नाय बोलाची !

**धा०**—(मनांत) एवढंच आपल्याला पुरे आहे. (उघड) बरं तर. तूं माझ्या विचाराला मिळती असलीस तरी पुष्कळ झालं.

**सो०—**हो, पण ते कोठें ऐकाचे हान. ते तुला बांधून तुझं लगीन लावून देतील. एकदां का त्यांचे मनांन भरलं मगशी ते का केल्याशिवाय रावाचे हान ?

**धा०—**हं. हं. त्यांची करूं कशी तरी समजूत. बरं तर आतां जा. मला वाचायचं आहे.

**धा०**—चला आपणही जावं.

(धा० जातो.)

---

## प्रवेश ३ रा.

( **स्थळ—**सुंदररावाचें घर. )

[ सुंदरराव व काशीबाई. ]

**का०—**ऐकलं का ?

**सुं०**—काय ह्मणत्येस ?

**का०—**काल बेनू आली होती–ती सांगते नवऱ्याचं कर्ज फेडा ह्मणून.

**सुं०**—(आश्चर्यानें) काय ? मी तिच्या नवऱ्याचं कर्ज फेडूं ? अरेच्चा; माझें मला कर्ज फेडावयाची शक्ति नाहीं तर हें आणखी कोठून फेडूं ?

**का०**—पण चौकशी तर करून पहा. थोडंसं असलं तर करा कांहीं खटपट. न करून तरी कसं चालतं! तिला जेवण देखील गोड कसें तें लागत नाहीं. रात्रंदिवस चिंतेंत असते. तुह्मांला दिसत नाही, अलीकडे ती किती सुकली आहे ती ?

**सुं०**—मला सगळें कांहीं दिसतें. पण मी तरी काय करूं ? माझा संसार संभाळूं कीं यांची काळजी करीत बसूं ! खरोखर, एवढी जिवाची यातायात करून व स्वतःची खराबी करून तिचं लग्न करून दिलं पण तिला बिचारीला घटकाभर कसें तें सुख नाहीं. पण काय तिच्या हातांत कोठें बांगड्या दिसत नाहींत त्या ?

**का०**—बांगडया का ? तिनें दिल्यात माझे जवळ काढून. आंगावर असल्या तर येतील एकादे वेळीं डोळ्यांत.

**सुं०**—डोळ्यांत यावयाला काय झालें! वालभर करायची तर आशा नाहीं पण असेल नसेल तें वाटेस लावायचें. अग पण याला कर्ज झालं तरी कशाचें? काय मुलांबाळांची लग्न कारणं केलीं कीं काय केलें—

**का०**—पण त्याचा इलाज नको का करायला? मेलं पोरीकडे तरी पाहून कांहीं केलं पाहिजे नको का? आणि लोक तरी नाहीं का आपल्याला हंसणार!

**सुं०**—काय! लोक आपल्याला हंसतील! ते कां बरं? कां त्यांचे आईबाप नाहींत? फेडतील पाहिजे तर. बरं, तशांत आपण कोठें श्रीमंत लागून गेलों आहोंत! आपलंच्च आपल्याला संभाळणं कठीण. माझं तर रात्रंदिवस देवापाशीं हेंच मागणें आहे कीं अब्रूमध्यें दिवस जाऊं दे ह्मणजे झालं. त्या मारवाड्याचे तीन हप्ते चढले—तो दररोज माझा जीव खातो—मला अन्न कसें तें गोड लागत नाहीं. रात्रंदिवस काळजी. एका मुलीसाठीं एवढी विवंचना! आणि तेवढीही सोसून जांवईबुवा मिळाले ते असे बत्तीसलक्षणी! आपलं नशीबच खोटं.

**का०**—पण त्या पोरीचा काय त्यांत वांक? तिच्या सुखाकडे आपण न पाहिलें तर दुसरें कोण पहाणार?

**सुं०**—(मनांत) हिनें तर माझा जीव खाल्ला. आज महिना झाला हीच टकटक (उघड)—अग पण तुझं ह्मणणं तरी काय? सांग तरी एकदांचं स्पष्टपणें.

**का०**—माझं कपाळ! म्हणणं कशाचं. एकदां त्यांना बोलावून सर्व कांहीं विचारायचं तर होतं. ती मेली पोरी सदा रडते माझ्या नांवानें.

**सुं०**—न रडेल तर काय करील! बिचाऱ्या गाईला कसाबाच्या हातीं नेऊन दिली तर तिनें तरी काय करावें? बरं, पण काग, तिची सासू तरी कशी आहे? ती तरी तिला नीट वागवते ना?

**का०**—अग बाई! ती त्या काळूबाईची मुलगी! तुमच्या ध्यानांत नाहीं वाटतं? तिच्या आईनें तर आपल्या सुनेला नको नकोसं करून शेवटीं नवऱ्यासुद्धां घरांतून काढून लावलं. तिची ही मुलगी! कशी अगदीं जिवंत आग! मग काय विचारायला पाहिजे!

**सुं०**—वा! मी समजत होतों कीं जरी तिला नवऱ्याचें सुख नाहीं तरी सासूसासऱ्यांचें तरी सुख असेल—पण तेंही नाहीं (उसासा टाकून) हर! हर! बेने, तुला केवळ दुःखसागरांत लोटून दिलें! (काशीबाईस) बरं तर, पाठीव त्यांना बोलवायला. पाहूं तर खरं काय ह्मणतात तें.

**का०**—त्यांनां मी सकाळींच बोलवायला पाठविलं होतं. रात्रीं येईन ह्मणून जबाब आला होता. अजून कां आले नाहींत कोण जाणे !

**सुं०**—अग त्यांनां कोठचा वेळ मिळणार ! असेल कांहीं टिफीण बिफीण.

**का०**—ते पहा ! मला वाटतं तेच आले. ( शामराव येतो. )

**सुं०**—या जांवयजी या. ( खुर्ची पुढें करून ) बसा. कसं काय ठीक आहेना ? ( काशीबाई आंत जाते. )

**शा०**—हो बरं आहे.

**सुं०**—मी तुह्मांला बोलवायला पाठविलें होतें तें अशासाटीं कीं-ती ह्मणत होती अलीकडे जरा तुमचा हात अडचणींत आला आहे-तसें जर असेल तर-

**शा०**—छः छः तुम्हांला कोणीं सांगितलं ? अजिबात खोटं-सगळं खोटं.

**सुं०**—खोटें असेल तर सोन्याहून पिवळें ! पण माझें ह्मणणें एवढेंच आहे. मनुष्य आहे, होतो एखादें वेळीं अविचार. कधीं कधीं शहाण्या माणसाच्या हातून देखील तसें घडून येतें. परंतु जोंपर्यंत आटोक्यांत आहे तोंपर्यंत कांहीं उपाय करून पहावा, मग एकदां कां अनिवार झालें ह्मणजे आवरणें कठीण !

**शा०**—तुह्मी काय ह्मणतां तें मला बिलकूल समजत नाहीं. शहाण्या माणसाच्या हातून घडून येतं काय ? व आटोक्यांतलें काय ? व अनिवार काय ? व मग आवरणं कठीण तें काय ? आहे तरी काय ?

**सुं०**—हें पहा, निजलेल्यास जागें करतां येतें. पण जाग्या मनुष्यास तें जागें कसें करायचें ! तुह्मी वेड पांघरूं लागलेत तर मग माझा निरुपाय आहे. हें पहा, तुह्मी शरमेनें खरी गोष्ट सांगण्यास कांकूं करीत असाल. पण मी तुह्मांला सांगतों-काय असेल तें सगळं सांगा-इलाज करण्यासारखं असेल तर पाहूं.

( काशीबाई आंतून चहा घेऊन येते व खुर्चीजवळ प्याला ठेवून आंत जाते. )

**शा०**—ह्मणण्यासारखं कांहीं नाहीं. अगोदरचं कांहीं देणें आहे. पण त्याचं काय ! फिटेल हं हं ह्मणतां.

**सुं०**—पण मीं ऐकलं त्या दिवशीं केसा निघाला होता ह्मणून.

**शा०**—( गोंधळून ) अं-अं-( रागानें ) मग त्यांत काय झालं ? एकाचा हप्ता द्यावयाचा राहिला होता. त्यानें केसा काढला. फेंकून दिले त्याचे ताबडतोब रुपये-हात्याच्या !

**का०**—( आंतून ) चहा थंड होत आहे हं. जांवयजींनां घ्यावयाला सांगायचं होतं.

**सुं०**—अरे हो. गोष्टीच्या नादांत विसरून गेलों (प्याला शामरावास देऊन) घ्या. टाका पिऊन. पहा सासूबाईला तुमची केवढी काळजी आहे ! ( मनांत ) ह्मणतात ना गांवचा लांड्या तो सासूचा देशपांड्या !

( शामराव चहा पितो. )

**शा०**—( उठून ) बरं तर मी येतों आतां.

**सुं०**—बसा हो. जाल. आतांशा तुम्ही येतां कोठें. पण कायहो कांहीं मारवाड्याचं देणं बिणं आहे का ?

**शा०**—ओ नो ! अगदीं नाहीं !

**सुं०**—तर फार चांगलं. पण हें पहा या मारवाडी लोकांशीं बिलकूल व्यवहार ठेवूं नका बरं. एकदां कां त्यांच्या हातांत कोणी सांपडला मग त्याच्या शरीरांतील रक्ताचा शेवटचा बिंदु राहीपर्यंत ते त्याला सोडीत नाहींत.

**शा०**—( हंसून ) यस् ! खरंच. (मनांत) हें काय नवीनसें मला कळलें नाहीं !

**सुं०**—बरं पण तुह्मांला सगळं मिळून देणं किती आहे.

**शा०**—अंः आहे. कांहीं विशेष नाहीं. ( रागावून ) आणि याला देणं का ह्मणावयाचं ! अहो तसं ह्मणाल तर कर्ज नाहीं कोणाला ?

**सुं०**—अहो पण कर्जाकर्जामध्यें देखील फरक असतो. कोणाला संसारामुळें कर्ज होत–पगार लहान कुटुंब मोठें–सिकनेस आहे–त्याला कर्ज झालें तर त्यांत त्याचा काय दोष ? दुसरं–मुलांचीं कारणें वगैरे केलीं तर त्यासाठींही कर्ज होतें. पण चैनीसाठीं कर्ज करणाऱ्याची सिंपुथी कोणालाही नसावयाची.

**शा०**—हें बोलणं मला लावून आहे वाटतं ? तसं असेल तर माझं येवढंच ह्मणणं आहे कीं माझें कर्ज मीच फेडणार. दुसरें कोणी फेडायला येत नाहीं. ( रागानें ) उगीच वर वर सिंपुथी दाखविणारे परंतु वेळ आला असतां बिलकूल उपयोगीं न पडणारे असे पुष्कळ सो कॉल्ड् वेल् उइशर्स असतात !

**सुं०**—हो तसेही असतील ! पण कांहो ते बेनूचे तोडे घेतलेत ह्मणून ऐकलें ?

**शा०**—( रागानें ) हें तुह्मांला कोणीं सांगितलं ? आणि घेतले ह्मणून काय झालं ? तिच्या दागिन्यांवर माझा हक्क नाहीं का ?

**सुं०**—नाहीं कोण ह्मणतो–पण हें पहा. हल्लींच्या काळांत नवीन सोनें घेणें ह्मणजे मुष्किलीची गोष्ट–ह्मणून जवळ असलेलें थोडेंबहुत संभाळून असलं ह्मणजे झालं. अहो आपण यांना दुसरं काय सुख देणार ! त्यांची दागदागिन्यांत मनस्वी हौस. तेव्हां होईल तोंपर्यंत त्या बाबतींत त्यांचें मन न दुखविणें हें उत्तम. पण अलीकडे मी पुष्कळ लोक असे पहातों कीं आपण मागें पुढें न पाहतां हवी तशी चैन मारतात व मग कर्ज वगैरे फेडण्यासाठीं घरांतील दागदागिने फुंकून टाकून बायकांस तळमळत ठेवतात ?

**शा०**—यस. असतील तसे ते करीत असतील त्याप्रमाणें व्हॉट्‌ ह्याव्‌ आय्‌ टु डु वुइथ घाट्‌ !

**सुं०**—पण कांहो ते तोडे विकलेत कीं गहाण ठेवलेत ?

**शा०**—विकूं कां ह्मणून ! थोड्या दिवसांत सोडून आणीन.

**सुं०**—ही एक आपल्या लोकांची मोठीच चूक आहे. अहो एकादी वस्तु गहाण ठेवण्यापेक्षां ती विकून टाकलेली पतकरली. गहाण ठेवण्यांत सर्व प्रकारें नुकसानच होतें. गहाण टेवलेली वस्तु परत तर यावयाची नाहींच पण दुसरा हा तोटा होतो कीं ती जिन्नस तर जिन्नस जाऊन कर्ज माथ्यावर रहातेंच. त्यापेक्षां सुरुवातींतच विकून टाकणें बरें. एक तर पुरा पैसा मिळतो व व्याज वांचतें आणि तशांत परमेश्वरानें मग हात दिला तर नव्यानें नाहीं का जिन्नस करतां येत ? अहो मी अशीं प्रत्यक्ष उदाहरणें पाहिलीं आहेत कीं मिळकत विकून टाकून सर्व कर्ज फेडून–आणखी एखादें लहानसें घरदार करून जो गृहस्थ सुखांत राहिला असता त्यानें ती मिळकत गहाण ठेवल्यामुळें–मिळकती परी मिळकत जाऊन–राहिलेली कर्जाची बाकी फेडण्यांतच त्या बिचाऱ्याचा जन्म गेला !

**शा०**—( उठून ) हं ! हं ! बरं तर मी येतों आतां ! तुह्मांला खोटं सांगून उगीच कोणी घाबरवून टाकिलें. कांहीं भ्यावयाचें कारण नाहीं–माझ्या आटोक्यांतलें आहे.

**सुं०**—तसें असलें तर ठीकच. पण हें पहा आमची बेनू आहे गरीब स्वभावाची व तिचं मन देखील कोंवळं आहे. तेव्हां होईल तोंपर्यंत तिचं मन दुखवूं नका. ह्मणजे झालं ! तुह्मीं शहाणेच आहां तेव्हां तुह्मांला जास्ती तें काय सांगावें.

**शा०**—( मनांत ) वा ! सांगितलें तें थोडेंच झालें वाटतं. ( उघड ) अं, त्याविषयीं तुह्मी निर्धास्त रहा. बरं तर मी येतों.

**सुं०**—येतांच तर मग. (काशीबाईस) अग, तुझे जांवयजी जातात हं—

( काशीबाई येते. )

**का०**—त्यांना ह्मणावं बेनूला उद्यां पाठवून द्या. रामाला पाठवीन सकाळीं. चार दिवस राह्याला पाठवा. तिला जरा बरं वाटत नाहीं—घेईल औषध बिवपध चार दिवस.

**शा०**—( मान डोलवून ) बरं—बरं—पाहूं. मी येतों आतां.

**सुं०**—या— ( शामराव जातो. )

**का०**—कां, काय सांगत होते.

**सुं०**—कसचं काय ! सगळी उडवाउडवीची गोष्ट ! बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं. अग हे निसंग, यांनां कशाची चाड नाहीं. सुरवातीपासून तो अखेरपर्यंत टाळाटाळी ! हे कधीं खरें बोलणार होते ! त्याला आपण काय करणार ! आपल्या-कडून सांगून पाहिलें—पुढं त्यांची मर्जी. असेल बायकोचें नशीब चांगलें तर चालतील अजून तरी विचारानें—नाहींतर ईश्वराची मर्जी—जी सर्वांची गोष्ट ती त्यांची ! बरं चल जेवण झालं का ?

**का०**—हो. थाळी पिडं मांडून ठेवलं आहे केव्हांच—चला—( जातात. )

---

## प्रवेश ४ था.

( **स्थळ** - खंडेरावाचें घर. )

### ( शामरावाची खोली. )

( शामराव व त्याची मित्रमंडळी चैनींत बसली आहे. थोडा वेळ गाणें बजावणें झाल्यानंतर. )

**शा०**—मग गजानन, आज रात्रीं रंगीचे येथें खचित येशीलना ? नाहीं तर आयत्या वेळीं फसवशील—

**गजा०**—वेड तर लागलें नाहींना तुला ? अरे येईन—खचीत येईन.

**शा०**—आणि तूं रे रामराव ?

**रा०**—माझी बाबा शूअरटी नाहीं. मी यावयाला एका पायावर तयार आहें. पण तो ओल्ड् फूल रात्रीं बाहेर जाऊं देईल तेव्हां ना!

**शा०**—हात्याच्या! तूं आतां उपड्या चाटतोस वाटतं! अरे अशा फूल्स्नां तसेच बोलत ठेऊन आपण आपलें काम करावें; दुसरें काय!

**रा०**—वः बुवा–तूं त्या ओल्ड् फूल्चा तडाका पाहिलास नाहीं अजून! अरे ही इज् अ रेग्युलर् डेव्हिल्!

**शा०**—बरं. जशी तुझी मर्जी. बरोबर आहे. तूं त्याच्या मर्जीविरुद्ध अगदीं उघडपणें वागावयास लागलास तर ही इज् शुअर् टु कट् यू ऑफ् उइथ् अ शिलिंग्!

**रा०**—ओ. आय् डोन्ट् केअर् फॉर् द्याट्. पण कशाला उगीच. आपलं लिमिट्मध्यें असलं ह्मणजे बरं. ( इतक्यांत शामराव ह्मणून कोणी हांक मारल्याचें ऐकूं येतें. )

**शा०**—कोण बरें हांक मारीत आहे?

**गजा०**—तूं आवाज नाहीं का ओळखलास? अरे तो आपला दुढ्ढाचार्य विश्वासराव.

**शा०**—कोण विश्वासराव! तर मग ती बाटली बिटली लपवून ठेवा!

**ग०**—व्हॉट् नॉन्सेन्स्! हू इज् ही?

**शा०**—अरे तसं नाहींरे! असा कांहीं प्रकार त्याच्या नजरेस पडला ह्मणजे मग त्याचें जें लेक्चर सुरू होईल तें कांहीं केल्या आटपणार नाहीं.

**रा०**—अरे चल. अशांची रे भीती कशाला! येऊं देना आंत!

**शा०**—कोण विश्वासराव! या–या. आंत या. दार उघडेंच आहे. ( विश्वासराव आंत येतो. )

**वि०**—कां शामराव? अरे तूं असतोस तरी कोठें? तुला भेटण्यास आज पंधरा दिवस पहातों आहें परंतु तुझी माझी भेट होत नाहीं. अशा कोणत्या कामांत गुंतला आहेस तरी?

**शा०**—अरे काम कशाचें! तुझी माझी भेट ती कशी होणार! तुझी लाईन् निराळी! आमची लाईन् निराळी!

**वि०**—अरे तुझा मार्ग निराळा, माझा मार्ग निराळा असें कां ह्मणेनास ! ठीकच आहे. [ बाटली वगैरे पाहून ] पण कायरे शामराव ? सुरादेवतेच्या पूजेचें हें साहित्य वाटतें ! ठीक ठीक ! आपण त्या देवतेचे निस्सीम भक्त बनलां आहांत असें आजपावेतों माझ्या ऐकिवांत होतें. परंतु हा पूजेचा थाट मात्र मीं खुद्द नजरेनें पाहिला नव्हता. अरे रात्रंदिवस हाच ध्यास ! शिव शिव ! शामराव काय तूं आरंभिलेंस हें ! अरे–ही गोष्ट वाईट–अगदींच रे वाईट ! या व्यसनानें कोणा एकाचें तरी कल्याण झालें आहे का ? अरेरे–हा नाद तुला लागला तरी कसा ! अरे ही अवदसा तुला आठवली तरी कशी ! तुझे आईबाप कोण आणि तूं त्यांचा मुलगा–अशा फंदांत पडावास ! शामराव माझें ऐक ! अरे या व्यसनांत एकदां का गर्क झालास कीं मग त्यांतून मोकळा होण्याची आशा नकोच. पहा. विचार कर !

**रा०व०ग०**—वन्स मोअर ! वन्स मोअर ! हं होऊं द्या आपला उपदेश. आपल्या शिष्यावर आपण केलेल्या उपदेशाचा इतका जबर परिणाम झाला आहे कीं दारु पिणें सोडून देण्याविषयीं शपथ घेण्यास तो अगदीं तयार झाला आहे. आपण संकल्प मात्र सांगण्यास तयार व्हा ह्मणजे झालें.

**वि०**—रामराव, मघां केलेला उपदेश ह्मणजे शामरावासच उद्देशून केला असें समजूं नकोस. हा उपदेश तुम्हां सर्वांसच लागू आहे. ज्याप्रमाणें शामराव माझा स्नेही त्याप्रमाणें तुह्मीही माझे स्नेहीच आहांत. पहा, या व्यसनाच्या पायीं शेंकडों निरपराधी मुलें पोरकीं झालीं ! हजारों मौल्यवान् प्राणी नाहींसे झाले ! लाखों लोक रसातळाला गेले. अरे या व्यसनाचे भयंकर परिणाम किती ह्मणून तुह्मांला सांगूं ! पहा विचार करा ! अरेरे ! हे भयंकर अनर्थ तुह्मी आपल्या नजरेसमोर दररोज पहात असतांनाही तुमच्या सारख्या विचारी, तरुण व होतकरू माणसांनीं या व्यसनाधीन व्हावें हें लज्जास्पद नव्हे काय !

**ग०**—[ हंसून ] हळू–हळू–शास्त्रीबुवा ! एकदमच सगळें नको. कांहीं उद्यां करितां शिल्लक ठेवा ! विश्वासराव, बहार केलीत बुवा ! खुब पोयेटिक आयुडि-आज् आफ्टर आयुडिआज् ! तुह्मी कीं नाहीं आतां मनिस्कूलचे समोर संध्यां-काळीं लेक्चर द्यावयास उभे रहात जा. खुब लोक जमतील तुमचीं लेक्चर्स ऐकावयाला !

**वि०**—बस्स ! उपड्या घड्यावर पाणी ! अरे तुह्मी माझे बाळपणाचे स्नेही म्हणून ही तुमची स्थिति पाहून माझें काळीज चरचरां चिरते, व मला बोलल्याशिवाय रहाववत नाहीं–पहा ! मी सांगतों तें ऐका–व द्या हा नाद सोडून, नाहीं तर मग पस्तावाल !

**ग०**—ऑल राइट्–ऑल राइट्–आम्ही या गोष्टीचा नीट विचार करूं आणि तुम्हांला कळवूं–थँक् यू फॉर् यूअर् काइंड् अॅड्व्हाइस् !

**वि०**—कर तूं थट्टा ! मला त्याचा राग बिलकूल नाहीं. व तूं जरी मला शिव्या दिल्यास तरी मी माझें कर्तव्यकर्म करण्यास चुकणार नाहीं. पहा अति झालें नाहीं तोंपर्यंत आवरा. पुढें मग अनावर झालें कीं बोंबलत बसावें लागणार. ठीक आहे शामराव. येतों मी–पण मी सांगितल्याची आठवण ठेव ह्मणजे झालें.

**ग०**—अरे पण जातां–जातां–एक ग्लास तर–( ग्लासांत दारू ओतण्यास लागतो इतक्यांत आठवण होऊन ग्लास तसेंच ठेवून ) ओ आय् बेग युअर पार्डन् !

**वि०**—( जातां जातां ) नफ्फट ! अगदींच निःसंग ! शामराव मी येतों बरं–येईन पुन्हां कधीं दोन चार दिवसांनीं !

**शा०**—( मान हालवितो. ) ( विश्वासराव जातो. )

**शा०**—गेली एकदाची पीडा ! पण काय असेल तें असो. या विश्वासरावाचा मला एक प्रकारचा असा कांहीं दरारा वाटतो कीं त्याच्या पुढें एक शब्द देखील मला बोलतां येत नाहीं ! मग काय त्याच्यांत मोहनी असेल ती असो ! पण कायरे रामराव, त्यानें दारूच्या ब्याड इफेक्टस्चें असे कांहीं हुबेहूब पिक्चर काढलें कीं दारु पिणें हें अति निंद्य आहे असें मला वाटूं लागलें आहे.

**रा०**—ओ ! व्हॉट ए सॉफ्ट् हेडेड् फेलो यू आर्. अरे त्याला दारूची मजा काय माहित ! कोठे एकाद्या इंग्रजी बुकामध्यें वाचलें असलें ते रिपीट् केलें दुसरे काय ? अरे पुराणांतलीं वांगीं पुराणांत ! यानांच एकदां चट लागूं दे कीं मग बघ मजा !

**शा०**—खरंच दारूचा डोझ घेतला ह्मणजे जे एक प्रकारचे प्लेझर् वाटते ते दारू न पिणारांस काय माहीत !

**ग०**—आतां कसें बोललास. व हें मनापासून बोललास असें प्रूव्ह करण्याकरितां भर हें ग्लास अॅन्ड् क्वॉफ् इट् ऑफ्.

**रा०**—कम् ऑन्.

**शा०**—ऑल् राइट्—ऑल् राइट्—कम् ऑन् ? ब्रेव्हो ! ब्रेव्हो ! ( दारू पीत असतां पडदा पडतो. )

---

## प्रवेश ५ वा

( **स्थळ**—पालवरस्ता. )

( **खंडेराव** चालले आहेत—समोरून **विश्वासराव** येतो. )

**खं०**—कोण विश्वासराव ? अरे तूं आतसा असतेस तरी कोठें ? फारसा दिसेस नाय तो ? अरे आमचेकडे दररोजचे दररोजः आल्याबगर तू रावाचा नाय पण आत् ते महिना न महिना तुजी भेट नाय ! हे हाय तरी का ?

**वि०**—( हंसत ) कांहीं विशेष नाहीं दादाजी ! अलीकडे कामकाजामुळें फुरसत कशी ती बिलकूल मिळत नाहीं.

**खं०**—वारे वा ! तु माला ह्याताऱ्याला फसवाला पातेस का ? पण मी फसाचा नाय वो ! अरे अगदीं परिक्षेचे दिवसान पण तुजा फेरा चुकत नवता. आत् ते परिक्षा नाय—काय नाय; माला वाटते तुजा न शामाचा तंटा बिंटा कायतरी झालय ! का क्रास् बिस झालय का ? इं ?

**वि०**—नाहीं हो दादाजी ! तंटा कशाचा ? पूर्वी शामराव चाहून बोलावीत असे—आतां त्याला नवीन नवीन सोबती मिळाल्यात तेव्हां उगीच त्यांच्यांत आपण कशाला पडावं—एवढ्याचसाठीं—दुसरं काय ? पुन्हां आतांशा जेव्हां यावं तेव्हां शामराव घरांत ह्मणून मिळत नाहीं. नेहमीं कोठेंना कोठें तरी बाहेर गेलेला असतोच !

**खं०**—खरच—आतशी त्याचकनाय घरान चित ह्मणजे अगदीच नाय ! हातावर पाणी पडाची खोटी—का चढली टोपी—चालला भायेर—कोठे जाते न का करते ते अगदी समजे नाय. पण विश्वासराव खरच सांग. तुजा याबद्दल तरक का धावते ?

**वि०**—माझा तर्क का ? मला असं वाटतं कीं, शामरावास हल्लीं वाईट

कोणता तरी नाद लागला आहे. व त्याची सध्याची कंपनीही चांगली दिसत नाहीं. मग खरं काय असेल तें असो.

**खं०**—तूं खर बोलतेस विश्वासराव. माला पण तसच वाटतय. कारण का म्हणशील तर बग आतशी टिफिणीवर टिफिणी चालल्यान. एक शनवार पण खाली जाय नाय.

**वि०**—पण दादाजी, शामरावला हा खर्च झेंपतो तरी कसा ? वीस पंचवीस रुपयांत तो तुह्मांला काय देतो—स्वतांचा खर्च तो काय करतो व ही अशी मजा तो कशी मारतो ?

**खं०**—माला पण तेच नवल वाटते ! (हळूच) विश्वासराव, तू शामाचा जिवाचा सोबती हायस व मी पण तुला तुजे लाहानपणापासून ओळखतय ह्मणूनच तुला माजे पोटानची गोष्ट सांगतय का आज पांच स महिने झाले त्या पोराजुन घरान एक अरदी पण दिली नाय. अरे अवढच नाय पण बायकोचे एक दोन दागिने पण फुकून टाकले अस कालच ती सांगतती. का सांगू विश्वासराव तुला, माजा जीव जळते–अगदी जळते !

**वि०**—काय ह्मणतां दादाजी ! इतक्या थरास गोष्ट येऊन पोहोंचली ह्मणतां ?

**खं०**—हो ! अस ते खरच.

**वि०**—मला वाटत नव्हतें कीं ही गोष्ट इतक्या थरास येऊन पोहोंचली असेल. शामराव वाईट संगतीस लागून त्यास एकादा वाईट नाद लागला असावा असें मला वाटत होतें, परंतु हें तुम्हीं सांगितलेलं ऐकून मला मोठें आश्चर्य वाटतें. पण दादाजी, शामरावच्या चेहऱ्यांत तुह्मांला कांहीं फरक दृष्टीस पडतो का ?

**खं०**—हो नाय कसा. आतशी कसा अगदीं सुजट न फुगट दिसते ! मला वाटते तो पीत अशेल. हं ?

**वि०**—मला असा संशय आज बरेच दिवस येत होता. व त्या दिवशीं कांहीं प्रकार माझ्या दृष्टीस पडला त्यावरून तर खातरी झाली. पीत असेल याविषयीं शंका नाहींच. पण पुष्कळ पितो असें मला वाटतें.

**खं०**—का ! ए तूं का बोलतेस पुष्कळ पिते ?

**वि०**—असं तर खरंच. व तें तुमच्याकडून लपवून ठेवण्यांत अर्थ नाहीं. व ही गोष्ट तुमच्या कानावर घालण्याचा माझा विचार होताच. इतक्यांत तुह्मींच

होऊन गोष्ट काढलीत. कांहीं दिवसांवर शामरावाला भेटावयास घरीं गेलों होतों. तों आंत एक दोन सोबत्यांस घेऊन बसला होता. मी तसाच आंत गेलों तों तेथें ह्या स्वाऱ्या हातांत ग्लासें घेऊन पिण्याच्या बेतांत होत्या असें दृष्टीस पडलें. मीं त्यास खूप घेतलं. शामरावानें सर्व निमूटपणें ऐकून घेतलें पण त्याचे सोबती बेशरमपणें चावटपणा करूं लागले तेव्हां मग मी निघून गेलों.

**खं०**—का ? माजे घरान ? अन् हें असं ? अरे पोरांनो तुह्मी भायेर पायजे तसे नाचा पण घरांन हे चाळे ! देवा ! देवा ! हे मी काय ऐकतय ! पण कारे विश्वासराव, या गोष्टीला आतां उपाय का करावा ?

**वि०**—दादाजी अंमळ धीर धरा ! शामराव तुमच्या पोटचा मुलगा तेव्हां त्याची कळकळ तुह्मांस यावी हें साहजिकच आहे, पण माझें व त्याचें बाळपणापासून संघटण असल्यामुळें व आह्मी लहानाचे मोठे एकमेकांच्या संगतींत झाल्यामुळें मलाही त्याचेविषयीं बरीच कळकळ आहे. व होईल तोंपर्यंत त्याला ताळ्यावर आणण्याचा मी प्रयत्न करीनच !

**खं०**—शाबास ! विश्वासराव शाबास ! सोबती असावा ते तुजे सारखा ! तुजे या बोलण्यानं माला कवडा तरी धीर आला सांगूं ! अन हे काम होयल ते तुजेच हातून. आजचे काळान आमचे सारखे ह्मातान्यांच कोण ऐकते ! आमी झालुं वेडे ! अवडी वरसं काडली ती गेली चुलीन ! बरं से, मी आतां जातंय. कर बाबा तुला बर दिशेल तसं. माजे ह्मातान्याचे साठीं. देव तुजं कल्याण करील.

**वि०**—बरं या–भेटेन तुम्हाला दोन चार दिवसांनीं.

[ खंडेराव जातो. ]

**वि०**—मला या म्हाताऱ्याची खरोखर दया येते ! काय चमत्कार आहे पहा. पैसा आहे, घरदार आहे सर्व कांहीं ठीक आहे–पण पोरांचा हा त्रास ! तीन मोठमोठाले मुलगे आहेत पण तीनही तीन तऱ्हेचे. थोरले वामनराव ते वामनरावच ! बायकोंच्या ओंजळींत पाणी पिणारे ! ऊठ ह्मणेल तर उठ ! बस ह्मणेल तर बस ! शामराव तर हे असे ! धाकलाभाय अजून लहान आहे पण त्याच्या आयडियाज् फार हाय् व जरा रिफॉर्मच्या साईड्चा आहे. अशा मुलांपासून आईबापांस सुख तें कोठून मिळणार ?

### पद

**भोळा बिचारा । लाभे न त्याला ।**
**जगीं या विसावा । थारा सुखा ना ॥ ध्रु० ॥**
**वैराग संसार । भासे तयाला ।**
**मुळिं नाहीं आधार । उरली न आशा ॥ १ ॥**

बिचारा म्हातारा तोंडास खीळ घालून आंतल्या आंत जळत आहे. असो. पण आतां शामरावचा काय विचार? मला तर वाटतें कीं दारु व नाचतमाशे याच्या पुढेंही शामरावानें भरारी मारली आहे! असा संशय तर येतो—पाहूं. चवकशी तर करूं? मग एकदांचं खरं काय तें समजलं ह्मणजे मग पुढें त्याचा विचार. चला पाय उचलला पाहिजे. वेळ फार झाला. ( जातो. )

---

## प्रवेश ६ वा.

[ **स्थळ**–खंडेरावाचें घर–शामरावाची खोली. ]

( शामराव व बेनाबाई )

**शा०**—तेवढी ती वाळी मला दे. मी फार दिवस ठेवणार नाहीं. पांच सहा दिवसांत तुला परत देईन.

**बे०**—तुह्मांला एकदां सांगितलेंना कीं ती गोष्ट मजकडून व्हावयाची नाहीं ह्मणून? मेला काय हा जुलूम तरी! ही वाळी तुमची आहे का? ती माझ्या आईची. तिनें मला चार दिवस वापरण्यासाठीं दिली आहे. तुमचे दागिने होते ते बहुतेक सर्व घेऊन गेलेत. हे दोन मात्र राहिले आहेत. तेंही पाहिजे असल्यास घेऊन जा. आग लावा त्यांनां! पण त्या माझ्या वाळीवर कां तुमचा डोळा?

**शा०**—अग पण ती तुला परत मिळाली ह्मणजे झालेंना? मग तुला तिची कां इतकी काळजी? मला अगदीं जरूर आहे ह्मणून. नाहीं तर तुजजवळ कधीं मागितली तरी असती का?

**बे०**—तुह्मांला काय जरूर दररोज आहे! जुगार खेळावा, दारवा प्याव्या, नाचतमाशास जावं आणि घरांतल्या दागिन्यांनां आग लावावी! मेली शरम

ह्मणजे कवडीची नाहीं. तेच तुमचे भाऊ पहा. त्यांनीं आपल्या बायकोला कशी सोन्यानें मढवून ठेविली आहे.

**शा०**—बरोबरच आहे. गुणा पाडी पूजा! जशी वहिनी दादांच्या अर्ध्या-वचनांत असते त्याप्रमाणें तूं राहिलीस तर तुलाही तसें होईल.

**बे०**—अहाहा! कोणी ह्मणेल जसें कांहीं खरंच! ठीक ठीक, आपल्या मनाप्रमाणें बायकोनें नवऱ्याच्या अर्ध्या वचनांत राहणें ह्मणजे त्यानें जें मागावें तें तिनें त्यास द्यावें. दागिने द्यावेत. मग ते कोणाचेही असोत. स्वतःचे असोत, लोकांचे असोत, त्याला हरकत नाहीं. असेंचना?

**शा०**—यांत काय संशय! नवऱ्याला काडीइतकें दुःख देऊं नये, त्याची मर्जी सदा राखावी, हाच चांगल्या स्त्रियेचा धर्म.

**बे०**—बरं बरं. हा बायकोचा धर्म सांगितला. आतां नवऱ्याचा धर्म कोणता? त्यानें बायकोच्या दागिन्यांस आग लावावी, तिच्या माहेरचे देखील दागिने असतील ते घेऊन जावे व न दिल्यास बायकोस मारावें, रात्रीच्या रात्री बाहेर काढाव्या, बायकोस घरीं तळमळत ठेवावें, दारवा प्याव्या, जुगार खेळावा, रात्रीं छाकट होऊन घरीं यावे. हाच का नवऱ्याचा धर्म?

**शा०**—(अंमळ ओशाळून) हा जरी नवऱ्याचा धर्म नाहीं तरी पण—

**बे०**—पण काय माती—द्या माझ्या प्रश्नाचा जबाब. कां आतां तोंड कां बंद राहिलं?

**शा०**—तसं नाहीं ग. नवऱ्यानें पण त्याप्रमाणें बायकोशीं वागलं पाहिजे—

**बे०**—ही गोष्ट खरीना? मग आहे कां आपलं तसं वर्तन?

**शा०**—(गोंधळून) नाहीं खरें. पण अजून सुधारण्याचा संभव नाहीं काय?

**बे०**—मनुष्यानें एकदां मनावर घेतलें तर अशक्य तें काय आहे? पण आपणांसारख्या सर्व व्यसनांत राबलेल्या माणसाची सुधारण्याची आशा व्यर्थ!

**शा०**—(लाडानें) तूं असं ह्मणावेंसना? तर तुला असं वाटतं कीं मी आतां कधीं सुधरायचा नाहीं! असेंचना? पण समज मीं आजपासून आपलें वर्तन सुधरायचा निश्चय केला तर कसें?

**बे०**—तर कसें हें काय विचारतां? सोन्याहून पिवळें! (आशेनें) घ्या शपथ कीं आजपासून तुह्मीं रात्रीं बाहेर भटकणार नाहीं, जुगार खेळण्याचें टाकून द्याल, व दारू पिण्याचें सोडून द्याल, घ्या शपथ पाहूं!

# पद

**प्रियकर नाथा सवतिस सोडा दुष्ट अशा ह्या मदिरेला ।**
**परिसावे तुह्मी सत्वरि आतां दासीच्या विनतीला ॥ धृ ॥**
**तिने केले नाहीं कुणाचे हितजगतीं ।**
**तिच्या पायी अगणीत लोक मरती ।**
**स्त्रियां पोरें अन्नासाठीं तळमळती ॥ १ ॥**

**शा०**—पण अशी शपथ घेऊन मला लाभ कोणता ? माझी आजची गरज सारशील ?

**बे०**—जर तुह्मीं मीं सांगितल्याप्रमाणें शपथ घेणार मग तुमची गरज ती आणखी कोणती राहिली ? ( विचार करून ) पण अगोदर सांगा, तुह्मांला वाळी कशाला पाहिजे ?

**शा०**—वाळी का ? दुसरी कशाला नको. ती गहाण ठेवून तिजवर तीनशें रुपये काढायचे आणि त्यांतून दोनशें एका मारवाड्यास भरायचे आणि शंभर राहिले ते काल जुगारांत एकाचे हातउसने घेतले आहेत त्याला द्यावयाचे !

**बे०**—बरं त्या वाळीवर एवढे रुपये काढून मग ती वाळी सोडविणार कशी ?

**शा०**—सोडवावयाची का ? तिचे तुला काय ? आठ दिवसांत परत आणून दिली म्हणजे झालं कीं नाहीं ? ( तिला जवळ घेऊन ) बघ. खरंच मी ती तुला लवकर परत आणून देईन ! या वेळेस तूं नाहीं ह्मणूं नकोस. मी आजपासून तुझ्या वचनाबाहेर एक पाऊलही टाकणार नाहीं. तूं सांगशील त्याची शपथ !—दे दे—तेवढी वाळी दे—

**बे०**—तुह्मांला काम काढून घ्यावयाचं असलं म्हणजे नेहमीं असंच बोलतां. पण मग एकदां वेळ निभून गेली ह्मणजे तुमचं येरे माझ्या मागल्या आहेच ! हा काय पहिला प्रसंग नाहीं !

**शा०**—( मनांत ) काम फिसकटतं वाटतं. अगदीं कसं जमण्याच्या बेतावर आलं होतं. पण जरा आणखी साखर पसरून तर पहावी ! नाहींतर मग नेहमींचा उपाय आहेच. ( उघड ) अग वेडे, तूं तशी शंका बिलकूल मनांत आणूं नकोस. मी खरंच सांगतों मला या सर्व गोष्टींचा अगदीं वीट येऊन गेला आहे !

**बे०**—( मनांत ) देवा ! तुला माझी करुणा तर आली नाहींना ? पहावं, नव्याण्णव तेथें पुरे शंभर ! हे ह्मणतात तें तरी खरं कशावरून नसेल ? व त्यांत मोठंसं नवलही नाहीं. अशा गोष्टी आपण पुष्कळ ऐकतों ! ( उघड ) बरं. समजा मी तुह्मांला वाळी दिली आणि मग तुह्मीं मला फसविलेंत तर—

**शा०**—( मनांत ) आतां वाणी संभाळली पाहिजे—नाहींतर सगळा व्यूह ढांसळेल—अगदींच भोळी बिचारी ! पण तशी आहे ह्मणूनच माझें फावतें. ( उघड )—हर ! हर ! आतां तसला संशय बिलकुल मनांत आणूं नकोस ! तूं माझी अब्रू संभाळणार ! आणि मी तुला फसवीन असं तुला वाटतं ? छः छः असं स्वप्नींही आणूं नकोस ! चल—दे सोडून सारा संशय व आण पाहूं वाळी कोठें आहे ती ! नाहीं तर मलाच सांग कोठें आहे ती. मी काढून घेतों—तुला कशाला त्रास—( चाव्या घेऊं पाहातों. )

**बे०**—नको—नको मीच काढून देतें—तुह्मांला ती सांपडावयाची नाहीं—

**शा०**—( रागावल्यासारखें करून ) इतका देखील माझा तुला विश्वास नाहींना ! नको तर मला तुझी वाळी नको ! कांहीं नको—जाऊं दे अब्रू गेली तरी हरकत नाहीं—मी चोर—मी लफंगा—ह्मणूनच कीं नाहीं तूं तुझ्या चाव्या मला विश्वासीत नाहींस ती—

**बे०**—( मनांत ) अग बाई—किती मी मूर्ख तरी ! हें मीं काय केलें—अशी चांगली संधि घालविली ! ( जवळ जाऊन आर्जवानें ) असं काय बरं करायचं ! येवढा राग येण्यासारखं मी काय बोललें ! ही मी आतां काढून देतें ! माझ्या मनांत तसला कांहीं विचार नव्हता ! घालवा तो राग तुमचा ! माझी शपथ आहे तुह्मांला.

**शा०**—( मनांत ) आतां जास्ती ताणून धरण्यांत फायदा नाहीं. पुरे झालं हें नाटक ! ( उघड ). बरं, बरं, गेला माझा राग ! चल—आण कोठें वाळी आहे ती—

**बे०**—पण तुह्मी अजून शपथ कोठें घेतली आहे !

**शा०**—( हंसत )—अरे हो—खरंच. शपथ घेण्याचं विसरलों—बरं तुझे गळ्याची शपथ ! झालं आतां—

( बेनाबाई वाळी पेटींतून काढून शामरावास देते. )

**शा०**—( वाळी घेऊन ) अहा ! बायको असावी तर अशी ! ( तिला आलिंगन देतो व कपडे चढवूं लागतो. )

**बे०**—कां-कपडे कां आतां चढवायचे झाले ! एवढ्या रात्रीं बाहेर का जावयाचें ?

**शा०**—हो. जरा जरूरीचें काम आहे तेवढं आटोपून येतों-हा आतांच आलों समज !

**बे०**—राहूंद्या तुमचें जरूरीचें काम. राहील सकाळपयत. माझं एवढं ऐका. आतां बाहेर जाऊं नकाच ! आणखी मघां घेतलेली शपथ इतक्यांतच विसरलेत काय ?

**शा०**—शपथ कसा विसरेन बरें ? ( आपणाशीं ) इनें मला तर अगदीं अडविलें. आतां कांहींतरी युक्ति लढवली पाहिजे. ( उघड ) हें पहा, मला आतांचे वेळीं जाऊं दे. ही वाळी जी तूं मला दिली आहेस ती आतांच नेऊन गहाण ठेवतों-व ज्यांचे पैसे द्यावयाचे आहेत ते तावडतोब देऊन टाकतों म्हणजे एकाच खेपेस सर्व कामांचा निकाल लागेल. मग पुन्हां त्यांच्यांत जाणें नको व त्या गोष्टीचें नांवहि नको !

**बे०**—बरं तर जा, व एकदांचा त्या लोकांचा संबंध तोडून टाका कसा तो. पण परत लौकर याल ना ?

**शा०**—माझें काम झालें कीं त्यावर एक मिनिट जास्ती राहिलों तर शपथ.

( जातो. )

**बे०**—वाळी गेली तरी पतकरली. आईची व बाबांची कशी तरी समजूत करतां येईल. पण हे ताळ्यावर येऊन सर्व व्यसनें एकदांची सुटतील तर त्या पासून जो लाभ होईल तो असल्या शंभर वाळ्या मजजवळ असल्यापासून होणार आहे काय ? खरोखरच नाहीं. शपथ तर घेवविली आहे. आतां पहावें काय होतें तें. देवा ! तूं त्यांना चांगली बुद्धि देऊन त्यांच्याकडून सर्व व्यसनें सोडीव. आई कुलस्वामिनी, त्यांचीं सर्व व्यसनें एकदांचीं सुटून ते ठिकाणावर आले म्हणजे तुझ्या नांवानें पांच सवासणी जेऊं घालीन ! देवा ! एवढी या अबलेवर कृपा कर ! तुझ्याशिवाय माझा त्राता कोणी नाहीं !

( पडदा पडतो. )

---

## प्रवेश ७ वा.

( स्थळ—रस्ता. )

( शामराव. )

**शा०**—वाळी तर मोठ्या युक्तीनें तिच्या जवळून उपटली ! ती तरी बिचारी भोळी पोर ! म्हणे शपथ घ्या ! माझ्या सारख्यास आतां शपथेची चाड राहिली आहे काय ? एक सोडून शंभर शपथा घेण्यास मागें पहाणारा हा गृहस्थ नव्हे. मात्र त्यामुळें माझें काम झालें ह्मणजे पुरे ! जुगाराचें व्यसन सोडण्याबद्दल शपथ घेवविली ! जुगार खेळण्यांत काय मजा आहे ती तिला काय माहीत ! एका क्षणांत रावाचा रंक–अरे चुकलों–रंकाचा राव ज्या खेळांत होतो तसला खेळ सोडण्याचा ती मला उपदेश करिते ! पण मीं कोठें इतका वेडा आहे कीं तिच्या ह्मणण्याप्रमाणें चालेन ! जुगार खेळणें, दारू पिणें, यांत जी काय मजा आहे ती त्यांचा अनुभव ज्यांस असेल त्यांसच माहीत ! इतरांस काय ? असो, आतां किती वाजले असतील बरें ? ( घड्याळ काढून ) सव्वादहा ! आतां कोठें बरें जावें ? पहिल्यानें रंगीच्या इथें जावें ! नको ! तिच्या दृष्टीस एकदां कां ही वाळी पडली ह्मणजे मग ती परत कसची देते ! तर आतां अड्ड्यांत जावें मग तिथें कसा काय रंग होईल त्याप्रमाणें रंगीच्या घरीं जाण्याचा विचार. चला तर तिथेंच जावें.

( शामराव जातो. )

---

## प्रवेश ८ वा.

( स्थळ—रस्ता. )

( डिटेक्टिव्ह पोलिसचा एक मनुष्य येतो. )

**डि० पो०**—हाच तो अड्डा. ( पॉकेटबुक काढून ) नंबर ७२७ गिरगांव—पानवाल्याच्या दुकानासमोर. हें समोरल्या बाजूस पानवाल्याचें दुकान ! ठीक—आतां कोठें जातात माझ्या हातांतून तें पहातों ! ( विचार करून ) पण आतां आंत कसं जायाचं–एकदम आंत जाण्याचा प्रयत्न केला तर ते लोक सावध होऊन इकडे तिकडे पळून जातील. सर्वांस तर पकडलं पाहिजे. वाजले तरी किती पाहूं ? ( वॉच काढून पहातो. ) साडेदहा वाजायला आले. इतक्यांत सर्व मंडळी कांहीं आली नसावी. सर्व मंडळी आल्यावर खऱ्या डावास सुरुवात होईल—

( विचार करून ) हं. युक्ति तर नामी. येथेंच जवळ हें धोतर अंगावर घेऊन भिकाऱ्याचा वेष घेऊन पडावं. व या लोकांचा खुणेचा शब्द असल्यास तो ऐकून घेऊन आंत जावं. दुसरे शिपाई वगैरे आजूबाजूस ठेवलेले आहेतच. शीळ वाजविली कीं आलेच. मग काय ! मुसक्या बांधून घेऊन जाऊं सर्वांस.

( धोतर आंगावर घेऊन पडतो. )

( शामराव येतो. समोरून विश्वासराव येतो त्यास पाहून. )

**शा०**—कोणरे विश्वासराव तूं रे इकडे कोठें ?

**वि०**—तुझ्याच भेटीस. (शामरावास एकीकडे नेऊन) हें पहा शामराव, खरंच सांग तूं कोणीकडे जात आहेस ?

**शा०**—कोठें नाहीं रे. इकडे माझ्या एक फ्रेंडचें घर आहे. त्याच्याजवळ कांहीं अगत्याच्या कामासाठीं जात आहें. पण तूं कां बरें मला भेटावयास आलास ? व मी इकडे जातों हें कोणीं तुला सांगितलें ?

**वि०**—त्याची तुला कशाला पंचाईत. माझी तुझी भेट झाली इतकेंच पुरे आहे. हें पहा शामराव तूं मजजवळून कितीही लपविलेंस तरी मला सर्व कांहीं माहीत आहे. हा समोरचा तुमचा जुगाराचा अड्डा व तिकडेच तूं जात आहेस. बोल ! खरं कीं नाहीं ?

**शा०**—( मनांत ) अरेच्चा याला रे हें कोणीं सांगितलें ! आतां लपवून काय उपयोग ! ( उघड ) विश्वासराव तूं ह्मणतोस तेंच खरें ! मी तिकडेच जात आहें.

**वि०**—वा ! शामराव तुला असें बोलण्यास लाज देखील वाटत नाहीं ! इतका का तूं निलाजरा झालास ? अरे, होतीं तीं व्यसनें थोडीं झालीं होतीं का ? त्यांत हें कमती होतें वाटतं—

**शा०**—विश्वासराव तूं आतां या वेळेस जा. मला फार वेळ नाहीं. पुन्हां कधीं भेटशील तेव्हां पाहिजे तितका उपदेश कर. जा आतां.

**वि०**—अरे पण माझं ऐकशील तर खरं. मी तुला कशासाठीं भेटावयास आलों हें तर ऐकशील.

**शा०**—( अंमळ रागावून ) तुला जा म्हणून सांगितलें ना ? मला कांहीं ऐकावयाचें नाहीं.

**वि०**—बाबा रागावूं नको. मी जातों. पण ऐक. मला अशी बातमी मिळाली

आहे कीं, आजरात्रीं अकरा वाजण्याच्या सुमारास तुमच्या अड्ड्यावर पोलिसाची धाड येणार आहे. तर संभाळ ह्मणजे झालें—जा आतां—खुशाल जा. मीं माझें कर्तव्यकर्म बजावलें. पुढें खबरदारी ठेवणें तुझें काम आहे.

( विश्वासराव जातो. )

( शामराव अड्ड्याच्या दाराशीं जात आहे इतक्यांत बाजूस एक भिकारी पडलेला पाहून )

**शा०**—कोणरे तो ?

**भि०**—नाहीं बाबा मी एक भिकारी आहें. दादा गरीबाच्या पोटांत आज चार दिवस अन्न नाहीं ! दादा एक पैसा द्याल तर मोठ पुण लागेल !

**शा०**—अरे चल. लबाड शिनचे ! चल हो बाजूला. सुरवातीलाच ही कोठची खुणूस ! ( अड्ड्याच्या दरवाज्याजवळ जाऊन दार ठोकतो. )

( आंतून ) कोण आहे ?

**शा०**—मी शामराव.

( आंतून ) खुणेचा शब्द कोणता ?

**शा०**—चोक. ( दरवाजा उघडतो. शामराव आंत जातो. )

( पांच सात मंडळी एका पटासभोंवतीं बसली आहे. शामराव आंत गेल्यावर खेळ सुरू होतो. कांहीं वेळ झाल्यावर. )

( बाहेरून ) अरे दार उघड.

( आंतून ) कोण आहे ?

( बाहेरून ) मी.

( आंतून ) खुणेचा शब्द कोणता ?

( बाहेरून ) चोक.

( दरवाजा उघडतात. त्याबरोबर पांचसात पोलीस शिपाई व एक दोन कॉन्स्टेबल आंत शिरतात. मंडळीची दाणादाण होते. एकदोघांखेरीज बाकीचे सर्व पकडले जातात. शामराव खिडकीवाटे पळून जातो. शिपाईलोक सर्वांचे हात बांधून त्यांच्या हातांत तेथलींच ग्लासें देऊन त्यांस पोलीसचौकीवर घेऊन जातात. )

---

## प्रवेश ९ वा.

[ स्थळ—दादरावरील एक बंगला. ]

( सुंदरराव एका कोचावर बसले आहेत. आंतल्या बाजूस पुतळाबाई एका कोचावर निजली आहे, व बाजूस काशीबाई–सोनाबाई–नानीबाई व घारुबाई बसल्या आहेत. )

**सुं०**—(स्वगत) पुतूस पाण्यावर न्या असें डाक्टरानें सांगितल्यावरून तिला येथें घेऊन तर आलों. आज दोन महिने झाले, तरी तिचें दुखणें कसें तें हटत नाहीं. उलट रोग वाढतच चालला आहे. पुतूची अवस्था मला कठीण दिसते. यांतून निभावली तर पुनर्जन्मच म्हणावयाचा! असो! ईश्वरेच्छा! आज तीन रात्रीं एकसारखें जागरण झाल्यामुळें, माझीही प्रकृति अंमळ बिघडली आहे. छेः या सर्व गोष्टींमुळें मला या संसाराचा अगदीं कंटाळा आला आहे! किती म्हणून काळजी बाळगावी! घरांत हा घोर! खर्चानें अगदीं जेरीस आणलें! दररोज नवें नवें औषध! शिवाय डाक्टराची फी ती निराळीच! हा अनिवार खर्च मला आतां झेंपत नाहीं. याखेरीज, कर्जाचा तगादा आहेच पाठीमागें. काय करावें हें मला अगदींच सुचेनासें झालें आहे. देवा! मला या सर्व कटकटींतून सोडविशील तर बरें!

( काशीबाई येते ).

**का०**—औषध द्यावयाची वेळ झालीना? साडेसहा वाजले.

**सुं**—काय इतक्यांत साडेसहा झाले! औषध का? हो! त्या मोठ्या बाटलींतलें द्यावयाचें. एक डोस दे व पुतूला ह्मणावं अंमळ स्वस्थ नीज. नाहींतर कालच्यासारखा खोकला त्रास देईल. बरं, मी डाक्टराकडे जातों व येत असेल तर घेऊन येतों. ( सुंदरराव जातात ).

( काशीबाई औषध देऊन सोनाबाई, नानीबाई व घारुबाई यांसह बाहेर येते ).

**का०**—बसायचें होतें येथें जरा. जाल थोड्या वेळानें. आतां घरीं जाऊन जेवा बिवायचं थोडंच आहे!

**सो०**—जेवाचं नाय ह्मगूण का झालं! रात होतेनं!

**का०**—एक दिवस चालेल. आहेत सुना घरीं. संभाळून घेतील एक दिवस.

**सो०**—नाय ते! अन, सुना तरी कोठच्या? बेनू ते दुरशी हाय. न मोटी घरान अशेल का गेलशेल माहेरी. त्यांनां दुसरा धंदा का हाय! हातावर पाणी

पडाची खोटी, का चढली शाल माथ्यावरती ! चालल्या माहेरीं. माहेरी नशेल गेली ते बसलशेल नवऱ्याचे तोंडाशीं. आताचे सुनांना बाय हात जोडावे !

**नानी**०—खरंच ! आमच्या पण सुना तशाच. एकीला तरी घराची कळकळ असेल तर शपथ ! जशा एखाद्या भाड्याच्या धरून आणाव्या कीं नाहीं तशा ! घरातल्या कामांत चित्तच नाहीं ! सासवांनी किती ह्मणून पहावं !

**का**०—खरंच. सुना आणावयाच्या त्या जर कामीं न पडल्या तर काय उपयोगाच्या ?

**सो**०—का बर ? आत तुमच्या सुना काय लान नाय ! आंगमसारख्या होवाला आल्या तरी पोरपणा नाय जाय !

**नानी**०—गेला पोरपणा ! पोरपणा कशाचा ! आपलं तें बरं सगळं समजतं ! आमचे मधलीला दुसरं कांहीं समजत नाहीं, पण तिचे समोर कांहीं बोला कीं गेला रपोट नवऱ्याला ! अगदीं तारायंत्र ! लावालावी करण्यांत तर पहिला नंबर ! आणि कामाविषयीं ह्मणाल तर तितकंच !

**घा**०—सध्याच्या सुनांना कामं करायला पाहिजेत कोठें ? आह्मांला काम करायची कशी हौस वाटे ! मी तर आपण होऊन आईचे हाताखालीं रांधप करी ! यांना चांगलें-इष्कीचे कपडे घालून मिरवायला मिळालं ह्मणजे झालं ! आह्मी अशा कामाच्या उठवळ असतों, तर केव्हांच झाले असते संसाराचे हालहवाल !

**नानी**०—अहो पण त्यांना कामं करायला सुचेल कोठून ? माथीं उकलायला दोन दोन कलाक लागणार ! चारचारदां साबवानें तोंडं धुवायचीं ! सकाळीं नवरा ऑफिसांत जाईपर्यंत त्याचेच तोंडाभोवतीं असायचं ! पुन्हा ऑफिसांतून नवरा आला कीं चालली खोलींत ! सारा दिवस फुस-फुस-फुस-फुस ! काय गड किल्ले घ्यावयाचे असतात कोणास ठाऊक ? मला तर बाई हे हिजडे चाळे बघितले ह्मणजे गुदगुल्या येतात !

**का**०—वाः असं काय तरी तुह्मी बोलतांहो ! सध्यांच्या नवराबायकोंत प्रीति जास्त असते ! त्यांना एकामेकांशिवाय चैन पडत नाहीं !

**घा**०—खरंच ! अगोदरच्या नवराबायकोंत प्रीति होती का ? नवरे बायकांना टाकून देत होते वाटतं ! त्यांना पोरं बाळं होत नव्हतीं ! एवढं मात्र खरं कीं त्यांच्यांत असले हिजडे-पोरकट चाळे नव्हते !

**नानी०**—कसं बोललींत ! त्यांना वडिलांची लाजमर्यादा पण जास्त होती ! आतां काय, जिकडे पहावं तिकडे नवरा न बायको ! नवरा फिरायला चालला–आली पाठीमागें बायको ! नवरा नाटकाला गेला–गेली बायको बरोबर !

**का०**—पण कांहो, जर बायकोला नाटक पहावसं वाटलं, तर तिनें नवऱ्याबरोबर न जावं तर दुसऱ्या कोणाबरोबर जावं वाटतं ?

**नानी०**—जाऊं नये कोण ह्मणतं. पण त्याला पण कांहीं मर्यादा आहे कीं नाही ? आह्मीं पण कधीं कधीं चांगलीं नाटकं पाहिलीं आहेत. पण आह्मीं कांहीं त्यांच्या आंगाला आंग लावून भर चौघांत बसत नव्हतों. असे बेशरम चाळे आमचे वेळीं बायकांत पण नव्हते व पुरुषांत पण नव्हते !

**घा०**—आणि नाटकाला जायचं तें पाहिजे त्या नाटकाला नाहीं ! तसंच चांगलं, बायकांनीं पहाण्यासारखं नाटक असलं तरच कधीं वर्षा सहा महिन्यांनीं जायचं. आतांसारखं, कसेंही नाटकं असो तिकडे पडल्या उड्या, असं नव्हतं !

**सो०**—तुमी का पण बोला–माला ते वाटते का या तरण्या पोऱ्यांना कोठचच नाटक दाखवाव नाय. नेमीं नेमीं नाटकं बगुन उद्धट न छिछोर होतान, बिज का !

**का०**—खरंच. मलाही तसंच वाटतं. ही चट त्यांना लावूंच नये हें बरं.

**सो०**—हो पण, आतांचे नवरे का कमी हान ! आधीं तेच दुवाड करतान बायकांना ! मगशी, ‘ अधिच बाय नाचरी न पायान बांधली घागरी ’ असं होते.

**घा०**—तें पण खोटं नाहीं. कांहीं कांहीं आतांचे नवरे बायकांना भारीच फूस देतात. त्यामुळें त्या अगदींच शेफारतात.

**नानी०**—खरंच. तो आमचे शेजारचा दिना. काय त्याच्या बायकोचा डौल ! अगदीं मडमेचा थाट. बायकोनें शेण पोतेरं केलेलं नाहीं चालायचं ! सरदी होईल. डाळ तांदुळ निवडलेलं नाहीं चालायचं ! डोळे खराब होतील ! चुलीजवळ शेक नाहीं घेतलेला चालायचा ! पित्त होईल ! मग बायको कशाला काम करते ? आहे ह्मातारडी सासू–मर मर काम करते ! ही चालली दररोज नवऱ्याबरोबर फिरायला. शनवार तर नाटकाशिवाय जातच नाहीं ! कां नाहीं मग बायको वरचढ होणार !

**सो०**—पुरे झाल्या आत गोष्टी ! रात होते न–चला

**का०**— हो बराच वेळ गेला या गोष्टींत—थांबा—स्टेशनावर पोहोंचवायला गडी देतें.

( गड्याबरोबर सोनाबाई नानीबाई घारूबाई जातात ).

[ नंतर डॉक्टर व सुंदरराव येतात, व डॉक्टर पुतळाबाईस तपासून औषध देऊन जातो. डॉक्टर गेल्यानंतर— ].

**सुं०**—राम्या—अरे राम्या—टोपी घाल पाहूं—हें औषध धांवत घेऊन ये पाहूं कसा तो. ( रामा टोपी घालून येतो. त्यास सुंदरराव औषधाचा कागद व पैसे देत आहेत इतक्यांत आंतून काशीबाई घाबऱ्या घाबऱ्या येते. )

**का०**—ऐकलं का. पुतू अगदीं स्वस्थ पडली आहे. हांक मारली तर हांक देत नाहीं. जरा बघून तर जावयाचं होतं.

**सुं०**—चल तर. ( आंत जातात. आंत काशीबाई रडल्याचें ऐकूं येतें—व सुंदरराव डोळे पुशीत बाहेर येऊन. ) हाय ! हाय ! माझी पुतू गेली ! हाय ! माझे लाडके पुतू ! हुंडा मागण्याच्या चालीपासून होणाऱ्या अनर्थास तूं बळी पडलीस ! हाय ! हाय ! हें दुःख पहाण्यास मला ईश्वरानें कशाला जिवंत ठेविलें ?

( पडदा पडतो. )

---

## प्रवेश १० वा.

( **स्थळ**— खंडेरावाचें घर. )

[ **धाकलाभाई व विश्वासराव.** ]

( धाकलाभाई हॉलमध्यें फिरत आहे. )

**धा०**—( स्वगत ) चला, एकदांची बी. ए. ची परीक्षा तर पार पडली ! आतां अभ्यासाच्या त्रासांतून थोडा वेळ तरी मोकळा झालों. या खेपेच्या इंग्लिश पेपरची मोठी धास्ती होती. पण पडलों त्यांतून पार ! नाहींतर ‘ पुनरपि-जननं पुनरपि मरणं ’ अशी स्थिति झाली असती ! पण जरी एक्झ्यामिनेशन्‌चा त्रास नाहींसा झाला तरी हा घरांतला त्रास कोठें सुटतो आहे ! दादाजींचा व दादीचा तगादा तर आहेच पाठीमागें. त्यांच्या आय्‌डियाज ह्मणजे सगळ्या ओल्ड्. व त्या आमच्या रिफाइन्ड आयडियाजशीं जुळणार तरी कशा ! बरं अगदीं उघडपणें तसें त्यांस सांगणें तेंही ठीक नाहीं ! असा हा दोन्हीकडून

मारा ! असो ! पण आज ही गडबड कशाची बरें असावी ? कांहीं तरी विशेष आहे यांत संशय नाहीं ! विचारून पहावें. अरे पण हा वर कोण येत आहे बरं ? ओ ! व्हाट सुपरस्टिशस् फूल ! पाहिलं असतां ग्र्याजुएट आहे पण एज्युकेशन घेऊन व्यर्थ ! एज्युकेशन् इज् लॉस्ट अपॉन् हिम् ! अरे तो इकडेच येत आहे—

( विश्वासराव येतो. )

**वि०**—( हंसत ) अलाव् मी टु कॉनग्र्याच्युलेट यू ऑन युअर् सक्सेस !

**धा०**—ओ ! थ्यांक यू. पण काय हो विश्वासराव, तुह्मी खालूनच आलेत तेव्हां गडबड कशाची आहे त्याचं कांहीं कारण समजलं का ?

**वि०**—कशाची गडबड ? पण मी येतां येतां आज संध्याकाळीं सत्यनारायणाची पूजा आहे असें ऐकलें खरें !

**धा०**—( हंसून ) हंः हंः दे आर् ॲट् देअर् गेम् अगेन् ! कांहीं नवसबिवस केला असेल !

**वि०**—मला पण असंच वाटतं. बहुतकरून आपल्या परीक्षेबद्दलच असेल नवस.

**धा०**—काय ? त्यांना ह्मणजे असं वाटतं कीं काय कीं त्यांनीं सत्यनारायणाला नवस केला ह्मणून मी परीक्षा पसार झालों ? वाः आह्मीं मेहनत केली ती सर्व व्यर्थ ! व्हॉट् सुपरस्टिशन् इज् धिस् !

**वि०**—तसं नव्हे हो. त्यांनीं नवस केला ह्मणून तुह्मी पसार झालां असें नाहीं पण त्यांच्या समजुतीप्रमाणें सत्यनारायणानें ही एक त्यांच्यावर मोठी कृपा केली असें त्यांस वाटून त्या देवतेस ते यथाशक्ति आपली कृतज्ञता दर्शवितात, दुसरें काय !

**धा०**—असें जर आहे तर त्यांना हें थोतांड कशाला पाहिजे ? ही पूजा वगैरे कशाला पाहिजे ? तें भटाचें व पुराणाचें थोतांड कशाला ? परमेश्वर जर सर्वज्ञ आहे व सर्वसाक्षी आहे, तर या साधनांशिवाय त्यास आपली कृतज्ञता दर्शवितां येत नाहीं काय ?

**वि०**—तो भाग निराळा आहे. त्याच्याविषयीं वादविवाद करणें व्यर्थ होय. मोठमोठे तपस्वी व तत्त्वज्ञ जेथें दमले तेथें आपणासारख्या क्षुल्लक माणसांचा

पाड काय ? जो तो आपल्या समजुतीप्रमाणें करीत असतो. त्यास तुह्मी असेंच कां करतां व असेंच कां करीत नाहीं असें सांगणें केवळ मूर्खपणा होय. पण एवढें मात्र खरें कीं असलीं थोतांडें करून ईश्वरास भाविक बुद्धीनें भजणारे लोक, तुह्मांसारख्या ईश्वराची भीति न बाळगणाऱ्या व ईश्वराच्या अस्तित्वाविषयीं मनांत विनाकारण संशय आणणाऱ्या अथवा आणण्याचा आव घालणाऱ्या लोकांपेक्षां हजारपट बरे.

**धा०**—तुमच्याबरोबर याविषयीं वादविवाद करण्यांत काय अर्थ आहे. तुह्मी ऑर्थोडॉक्स् पीपल दुराग्रही फार. नॉट् ओपन् टु कनव्हिक्शन्.

**वि०**—तुह्मी कांहीं ह्मणा. ऑरथोडॉक्स् ह्मणा किंवा सुपरस्टिशस् ह्मणा. आह्मीं तसे आहोंत ह्मणून तर ईश्वराची कोणत्याना कोणत्या तरी रीतीनें थोडीबहुत सेवा घडते. पण तुमची स्थिती धड ना इकडे ना तिकडे. त्रिशंकूसारखे मधल्यामध्येंच तुह्मी लोंबत रहातां ! बरें तें असो. मी हें काय नवीन ऐकतों, " तुह्मी ह्मणें लग्न करीत नाहीं. " त्याचें कारण काय ?

**धा०**—लग्न न करण्याचें कारण माझ्या मनांत इंग्लंडला जावयाचें आहे व तेथून ब्यारिस्टर होऊन यावें असें आहे.

**वि०**—येथेंच ॲड्व्होकेट होतां येत नाहीं काय ?

**धा०**—छेः कोण आतां त्रास करीत बसतो. बी. ए. होण्यांत एवढीं वर्षें गेलीं. आतां पुन्हां येथें ॲड्व्होकेट होण्यासाठीं हार्ड स्टडी करावयाचा. छेः तसा करावयाची इच्छा नाहीं व खरंच सांगतों, ताकदही राहिली नाहीं ! खरोखर, अवर्स इज ए किलिंग स्टडी. तेथें एवढा कांहीं हार्ड स्टडी करावा लागत नाहीं. दुसरं, माझ्या मनांत इंग्लंड पहावयाची इच्छा फार आहे. ती देखील पुरी होईल. एकांत दोन्ही कामें साधतील.

**वि०**—लग्न करून इंग्लंडला जा.

**धा०**—तुह्मी तरी काय असं ह्मणतां ! अहो, हे आतां आठ दहा वर्षांच्या मुलीशीं माझें लग्न करणार आहेत का ? चांगली पंधरा सोळा वर्षांची मुलगी बांधतील गळयात. मग काय, लग्न झालें कीं लागला संसार पाठीमागें. मग कसचं जाणं होतें ! आणि येथें ॲड्व्होकेट होण्याला तीच अडचण यावयाची. एकदां संसारांत गुंतलं व तीं पोरंबाळं पाठीमागें लागलीं ह्मणजे मग झाला अभ्यास ! कांहीं होईल तर एव्हांच.

**वि०**—यस्, यू आर् राईट. मग अभ्यास करायला फार कठीण पडेल. बरं पण याविषयीं दादाजींचं काय मत आहे ? त्यांना विचारलंत नाहीं वाटतं ?

**धा०**—अजून तर नाहीं. पण पुढें गोष्ट काढावी लागणारच. कारण पैशाशिवाय तर तेथें जाणं होत नाहीं. माझे जवळ आहेत चार पांच हजार स्वतांचे. ती लेगसी आली होती ती, पण तेवढ्यांत काय होणार ? त्यांचे जवळून होईल तितकें करून सगळेच पैसे काढले पाहिजेत. नाहीं तरी दोन तीन हजार तरी खरे.

**वि०**—पण मला नाहीं वाटत कीं दादाजी तुह्मांला इतके देतील.

**धा०**—मला तर तीच भीति आहे.

**वि०**—पण त्यांना विचारून तर पहा.

**धा०**—बरं. आतां विश्वासराव, माझं लग्न न करण्याचें दुसरें कारण हें. जरी सेल्फ् सिलेकशन्च्या फेव्हर्मध्यें मी आहें तरी पेरेन्टस्ना डिसप्लीझ् करूं नये म्हणून कदाचित् माझे विचार मीं तसेच गुंडाळून ठेवले असते. परंतु ही सिस्टिम मी कधीं एनकरेज् करणार नाहीं. दादाजी ह्यासंबंधानें नोटोरिअस् झाले आहेत. तुह्मीच पाहिलंतना त्या शामाच्या सेकंड म्यारेज्च्या वेळींपण सुंदररावांकडून कशी एकूण एक रीत चोपून घेतली. आणि आह्मी तर त्यांचे लास्ट् ॲन्ड्—

**वि०**—बेस्ट म्हणाना ! लाजतां कशाला ! तुमचं असंच म्हणणं कीं नाहीं कीं तुह्मी त्यांचे लास्ट् व बेस्ट् सन् असल्यामुळें जितका वेववेल तितका हुंडा घेतल्याशिवाय ते रहाणार नाहींत ? ही उईल् मेक् धी बेस्ट् ऑफ धिस् ऑपरच्युनिटी ही क्यान्.

**धा०**—हो. असंच तर खरंच. आणखी तें आपल्याला तर खपायाचें नाहीं. ह्या परनिशस् सिसटिम्मुळें आपल्या जातींत अनर्थ होऊं लागला आहे. शेंकडो मुलींचे बाप कर्जाखालीं चुरडून जात आहेत. व ह्यापुढें काय काय भयंकर परिणाम होतील त्याची कल्पना केली ह्मणजे थरकांप सुटतो. त्या सिसटिम्ला आपण होऊन एन्करेजमेंट् देणं हें आपल्यासारख्या एज्युकेटेड् लोकांना शोभतं काय ? बोला—

**वि०**—अलबत् नाहीं. आणखी ही चाल जर खरोखरीच मोडणें असेल तर तुमच्या सारख्या विद्वान् व तरुण अविवाहित मुलांनीं असे विचार मनांत

बाळगून आपल्या आईबापांचीं मनें वळवून हुंडा बिलकुल न घेतां लग्न करण्याचा निश्चय केला तरच कांहीं होणार आहे. दुसरा मार्ग बिलकुल नाहीं.

**धा०**—व म्हणूनच मी या बाबतींत अनुकरणीय असं एक्झ्याम्पल् घालून देणार. कांहीं हरकत नाहीं पेरेन्ट्स् डिसप्लीझ झाले तरी. अशा चांगल्या ऑब्जेक्ट्स्साठीं घटकाभर त्यांची डिसप्लेझर् झाली तरी पतकरली. परंतु यापासून होल् कम्युनिटीचे कल्याण होणार आहे. तर झाला माझा निश्चय. जर मी लग्न केलें तर कोणाजवळून एक कवडी देखील हुंडा घ्यावयाचा नाहीं.

**वि०**—शाबास परमेश्वर तुमचा निश्चय सिद्धीस नेओ. बरं तर मी येतो.

**धा०**—चला; मीही तुमच्याबरोबर खालीं येतों. पाहूं काय चाललं आहे तें.

( जातात )

---

## प्रवेश ११ वा

[ **स्थळ**—खंडेरावाचें घर ]

( **वामनराव** व **पुतळाबाई** )

( वामनराव आपल्या खोलींत इझीचेअरवर पुस्तक वांचीत पडले आहेत. इतक्यांत पुतळाबाई आंत येते, तीस पाहून )

**वा०**—कां आज इतका वेळसा झाला ?

**पु०**—वेळ कशाचा ? कारभार आटपेल तेव्हांना ? शेणपोतेरें होता होतां दहा वाजून जातात. सगळंच मला करावं लागतं. पुन्हां इतकं करूनही दादींच्या मनास येत का ? छेः ! मला बाई या घराचा कंटाळा आला आहे !

**वा०**—अग कंटाळा येऊन उपयोग काय ? सोसलं पाहिजे.

**पु०**—सोसा तुह्मी ! मी नाहीं सोसणार ! तुमचे आईबाप तुह्मांला गोड. मला नाहीं. तशांत, दादींना तर सगळ्या गांवचा हेवा. चार दागिनें केले आहेत ते त्यांच्या डोळ्यांत खुपतात, व ह्मणूनच हा सर्व जाच !

**वा०**—छेः छेः तूं वेडी आहेस. तिजजवळ दागिने नाहींत कीं काय ! आणि तूं कोण तिला परकी आहेस काय ?

**पु०**—परकी नसते तर असा जाच नसता. तीच तुमची बहीण ! किती तिचे लाड आणि काय तिच्या जिवाचे सोहाळे ! बरोबर आहे. ती पडली पोटची.

आह्मी बोलून चालून परक्यांच्या. पण बरं आहे, कामाची इतकी उठवळ आहे कीं इकडची काडी तिकडे नाहीं उचलीत ! त्याचा देखील त्रास आह्मी काढावा ! दोन दोन तीन तीन महिने माहेरी ! ठीकच आहे. आहेत भावजई काम करायला मग सासरी राहतात कशाला ! नवराही येतो दररोज माहेरीं ! मग आणखी तें काय पाहिजे !

**वा०**—आज वाटतं हें सारी रात्र असंच चालावयाचं ?

**पु०**—बरोबरच आहे, आपल्याला तें कसं आवडणार ! तुह्मांला मी खरोखर सांगते कीं मला या घरांत व अशा जाचात रहावयाचें ह्मणून नाहीं.

**वा०**—ह्मणजे तूं जाणार कोठें ?

**पु०**—तुह्मी आपलं निराळं करा.

**वा०**—काय म्हणतेस ? आईबापांनां सोडून निराळा संसार मांडूं ? छेः छेः वेडी कोठची !

**पु०**—नाहीं तर मी उद्यां माहेरी निघून जाणार. मग तुह्मांला वाटेल तें करा. ( रागावून जाऊं लागते. )

**वा०**—( तिला बळेंच वळवून ) वेडी नाहींतर ! या एवढ्याशा क्षुल्लक कारणासाठीं निराळा संसार मांडणें हें मला शोभेल काय ? पुन्हां तसेंही करून आपला नफा कोणता ? चार चौघांत एकत्र रहाण्यांत केवढी मौज आहे बरें. एक तर आपण आपल्याच मंडळींत नेहमीं राहतों. हात आहे, पाय आहे, पाहिजे त्यावेळीं—मध्यरात्रींही—आपल्यासाठीं सगळें घर मेहनत करील. खर्चही पुष्कळ वांचतो. चारचौघे खातात तेथें दोन माणसांचें पोट सहज भरतें. पण तींच दोन माणसें निराळा संसार करूं लागलीं तर मग त्यांस सर्वच वेगळें नको का करायला ! भांडीं कुंडीं सर्व कांहीं पाहिजे. नको तें काय ? अग तो संसारच ! मग दोन माणसांचा काय आणि पंचवीस माणसांचा काय ! एकच !

**पु०**—तें सगळं खरं ! पण केव्हां ? जर सर्वांचं मन एक असेल तेव्हांना ? नाहीं तर, बाहेरून दिसतं कीं सर्व कुंटुंब एकत्र रहातं पण एकाच दुसऱ्याशीं ठीक असेल तर शपथ ! जर एकमेकांविषयीं सर्वांचीं मनें शुद्ध असलीं तर एकत्र रहाण्यांत शोभा. नाहीं तर त्यापेक्षां निराळं केलेलं अधिक चांगलं.

**वा०**—तूं म्हणतेस तें खरें पण—

**पु०**—पण वीण मी कांहीं समजत नाहीं. मी ह्मणतें हें जर आपणांस खरं वाटतं तर मग मी आपणास कांहीं सांगतें तें ऐकतां का ?

**वा०**—काय ह्मणतेस तूं ?

**पु०**—जर मी तुमची खातरी करून दिली कीं तुह्मीं व मी दादाजींना व दादींना नकोशीं झालों आहोंत व त्यांच्या मनांत आपण निराळं करावं असं आहे तर तुह्मी निराळे व्हाल !

**वा०**—निराळें होण्याची गोष्ट सध्यां राहूं दे एकीकडे. पण असा पुरावा तुजपाशीं कोणता आहे तो तर कळूं दे !

**पु०**—नको. तुह्मी त्यांचे जेवढे व्हाल तेवढे माझे थोडेच होणार आहां ! तुह्मांला माझं ह्मणणं खरंच वाटायचं नाहीं.

**वा०**—अग पण सांग तरी खरी.

**पु०**—छे ! नको बाई—सांगितल्या सारखं ऐकेल तशाच माणसाला सांगावं. तुमच्यासारख्याला न सांगितलेलं बरं !

**वा०**—झालं. अशानें समजावं तरी काय ? तुझ्यावर माझा पूर्ण विश्वास आहे ! तूं मला कधींही खोटें सांगणार नाहींस. चल. सांग पाहूं काय तें.

**पु०**—हं. तसं असेल तर सांगतें, परवां दादाजी व दादी मधल्या खोलींत गोष्टी करीत बसलीं होतीं.

**वा०**—मग काय, तूं त्यांचें ह्मणणें चोरून ऐकलेंस वाटतें ?

**पु०**—झालं. हेंच तें ! मी कशाला त्यांचं ह्मणणं चोरून ऐकतें ! माझं काय अडलं आहे तसं करायला ! ( रागावून ) सहज कानीं पडलं तर कानांत बोळे घालावे वाटतं !

**वा०**—अग पण अशी रागावतेस कां ! नीट तरी बोलशील !

**पु०**—नीट काय बोलणार ! ऐकणारे हुशार पडलेत ना !

**वा०**—बरं तें असो. मग तुझ्या कानीं त्यांचं कोणतं बोलणं पडलं ? चल सांग पाहूं कशी झट्कन.

**पु०**—मी त्यावेळीं शेजारच्या खोलींत तांदूळ काढायला गेलें होतें तों त्यांचं भाषण माझ्या कानीं पडलं. दादी तुमचं नांव घेऊन ह्मणाल्या—तो फार बेपर्वा झाला आहे—सांगितलेलं तो मुळींच ऐकत नाहीं—तब्बेत सांभाळणं

फार कठीण–मला त्याचा आणि त्याच्या बायकोचा ह्मणजे–माझा–फार कंटाळा आला आहे.

**वा०**—हं. ती असें ह्मणाली ?

**पु०**—थांबा. अजून तर मुख्य पुढेंच आहे. दादी तर येवढंच ह्मणाल्या पण दादाजी काय काय बोलत होते.

**वा०**—हं ! दादाजी बोलत होते ? छेः अशी गोष्ट कध्धीं होणार नाहीं.

**पु०**—नाहीं तर नाहीं ! मी आपली लबाड–झालं !

**वा०**—तसं नाहीं ग. तुला लबाड कोण ह्मणतं ! बरं तें असो. असं ते काय ह्मणाले ?

**पु०**—दादाजी तुमचं नांव घेऊन म्हणाले त्याला आतांशा शिंगें फुटूं लागलीं आहेत. तो कोणाचं ऐकत नाहीं. मस्त झाला आहे. जर कां अगदीं चोख असता तर काय केलं असतं कोणास माहीत !

**वा०**—( रागावून ) हं असं ह्मणाले ?

**पु०**—आणखीहीं ह्मणाले कीं–जर त्याला आपल्या येथें पतकरत नसेल तर त्यानं आपलं निराळं करावं; आणखी तेही लवकर तितकं बरं ! याशिवाय माझेविषयीं ते नाहीं नाहीं तें बोलले ते निराळंच. खरंच सांगतें, मी तें सगळें तुमच्यासाठीं गट्ट गिळून टाकलें; नाहीं तर असे शब्द मी कधीं सहन केले नसते !

**वा०**—काय ! माझ्याविषयीं दादाजी व दादी यांनीं असं ह्मणावें ना ? त्याच प्रमाणें हिचाही त्यांनीं असा छळ मांडावा ना ? छेः हें ठीक नाहीं.

**पु०**—ठीक नाहीं कसं. ठीकच आहे. रहा ! अजून एकत्र रहा. एकत्र रहाण्यांत मौज आहे ना ? मारा तर अशी मौज ! एव्हां नाहीं तें समजायचं. आज आपल्या पाठीमागें असं बोलले. उद्यां आपल्या तोंडावर असे–यापेक्षांही अधिक–बोलतील. मग उघडतील तुमचे डोळे !

**वा०**—छेः ! आतां यापुढें एकत्र रहाण्यांत अर्थ नाहीं ! ( विचारांत पडतो. )

**पु०**—कां विचार कसचा चालला आहे ?

**वा०**—विचार कसला वेगळं व्हावयाचं—

**पु०**—( आनंदानें ) खरंच ना ? नाहींतर या वेळापुरतं ?

**वा०**—छेः छेः झाला माझा निश्चय.

**पु०**—मग केव्हां निराळं व्हावयाचं ? माझ्या माहितीचें एक घर आहे. माझ्या माहेरच्या शेजारचें तें. किती सोईचें आहे सांगू. आपण सांगाल तर उद्यांच्या उद्यां त्याची तजवीज बाळाला सांगून करवितें.

**वा०**—इतकी उतावीळ होऊं नकोस. एक दोन महिन्यांत आपण निराळं केलंच समज. एकदम घाई करून उपयोग नाहीं.

**पु०**—छेः छेः दोन महिने कोण थांबतं ! मी तर उद्यांच्या उद्यांच येथून पाय काढायला तयार आहें. नाहीं पण, तेंच घर घ्यायचं ना ? पहा, ही संधि घालवूं नका, नाहीं तर दुसरा एकादा तें भाड्यानें घेईल.

**वा०**—बरं तर उद्यां त्याविषयीं विचार करूं. चल निज आतां. बारा वाजून गेले.

**पु०**—तुह्मी नाहीं कां येत ?

**वा०**—मला आणखी कांहीं वेळ वाचावयाचें आहे. जा निज तूं.

**पु०**—( जातां जातां स्वताशीं ) ठीक झालं. माझ्या मनांतील फार दिवसांचा हेतु आज पार पडला ! आज सात आठ महिने एकसारखी पाठ पुरविली. शेवटीं आज काम तडीस लागलं ! चांगलं व्हायचं असलं ह्मणजे केव्हांही होऊन जातं ! आतां लवकरच माझी मी मालकीण होणार ! मग मला विचारतं पुसतं कोण आहे ! सासूबाईनां ह्मणावं आतां मिरवा आपला सासूपणा सुखानें !

( पुतळाबाई निजावयास जाते. )

**वा०**—( स्वगत ) काय बरं करावं ? मीं मोठ्या अडचणींत पडून गेलों आहे. इकडेही बोलवत नाहीं. तिकडेही बोलवत नाहीं. निराळं करा, निराळं करा, असा एकसारखा आग्रह करून इनें तर माझी अगदीं पाठ पुरवून टाकली आहे ! दररोज हीच गोष्ट ! छेः बुवा ! आपल्याला तर हा त्रास पतकरत नाहीं ! या गोष्टीचा कोणत्याही रीतीनें निकाल लावला पाहिजे. बरं पण, इच्या ह्मणण्यास कबूल होऊन निराळा संसार मांडावा, तर तेंही मला ठीक दिसत नाहीं. काय ! इच्या सांगण्यावर विश्वास ठेवून मी दादाजीस व दादीस या त्यांच्या ह्मातारपणीं सोडून जाऊं ? छेः असें केल्यानें लोक माझी फजिती करणार नाहींत काय ? सोयऱ्याधायऱ्यांत, मित्रमंडळींत माझी छीः थूः

होणार नाहीं काय ? (विचार करून) पण मी आतां करूं तरी कसं ! इच्या ह्मणण्यास रुकार न दिला तर इचा असा हा त्रास दिवसेंदिवस वाढत जाणार यांत संशय नाहीं. बरं, अंमळ व्याघ्ररूप धारण करीन तर इच्यापुढें माझं चालणार काय ! मघांच पाहिलं ना, जरा कोठें उडवाउडवीच्या गोष्टी करूं लागलों तों रागानें कशी लाल होऊन गेली ! व तिची ती रागावलेली मुद्रा पाहिली ह्मणजे आपण तर बुवा अगदीं घाबरून जातों ! निराळं करीत नाहीं असा जर जबाब देईन तर ती मला जिवंत ठेवित नाहीं हें खचितच ! बरं पण, इचा हा त्रास भोगण्यापेक्षां इचें ह्मणणें काय आहे त्याचा विचार करून निराळं झालं तर कसं ? निराळं झाल्यास फायदा कोणता होणार ? हं—(विचार करून) छेः एका गोष्टीखेरीज दुसरा कोणताही फायदा होणार नाहीं ! ती एक गोष्ट कोणती, तर ही नेहमीं सुखी राहील व इचा माझ्या मागचा त्रास चुकेल. एवढा फायदा होईल खरा ! बरं ! पण इने तरी माझा असा कोणता अपराध केला आहे कीं तिला मी सुख देऊं नये ! जर निराळं राहिल्यानें इला सुख व आनंद होणार आहे तर मग एकत्र राहण्यांतच जास्त काय आहे ? उलट ही नेहमीं अशी असंतुष्ट राहणार—छेः मला सगळं कांहीं खपेल, पण ही असंतुष्ट राहिलेली खपणार नाहीं ! माझ्या लाडकीला मीं सुख देऊं नये तर मग कोणी द्यावें ! व या कामांत मलाही तिचा कांहीं विशेष वांक दिसत नाहीं. ती ह्मणते तसं असेलही, दादाजी तर तोंडाचे उष्टे आहेत. दादीलाही आतां त्यांचा वारा लागूं लागला आहे. तेव्हां त्यांनीं इचा असा छळ मांडावा यांत मोठेसें नवल नाहीं. अशी जर गोष्ट खरी असली तर तिनें तरी यांचा असा जाच कां सोसावा ! काय, आह्मी त्यांचे ओशाळे आहोंत ? बस्स. निराळं करण्याचा विचार करावा. हाच बेत उत्तम. त्यामुळें ती सुखी होईल, माझा त्रास चुकेल व या ह्मातार्‍यांचीही चांगली खैरी मोडेल. (जातो.)

---

## प्रवेश १२ वा.

[ **स्थळः**—खंडेरावाचें घर. ]

**( शामराव बेनाबाईस धक्के देत देत खोलींतून बाहेर आणतो )**

**शा०**—बोल, देतेस कीं नाहीं दागिने ?

**बे०**—अहो पण ऐकाल कीं नाहीं ?

**शा०**—बस्स. मी ऐकत बियकत कांहीं नाहीं. दे दागिने-दे-आण कोठें आहेत ते—

**बे०**—पण मी दागिने देऊं तरी कोठून ? तुमचे होते नव्हते तेवढे दिले. आतां आंगावर एक फुटकी कवडी तरी आहे कां ? नाहीं म्हणायला एवढा एक गरसोळीचा मणी आहे. तो पण घेऊन जा पाहिजे असल्यास !

**शा०**—काय ? त्या तासाच्या बांगड्या कोठें आहेत ?

**बे०**—त्या बांगड्या आईच्या. त्या तिच्या तिला परत दिल्या.

**शा०**—लुची ! तुला लग्नांत तुझ्या आईनें त्या घातल्या होत्याना ? त्यावर तिचा काय हक्क ? चल-आण जलदी. एथेंच कोठें लपवून ठेवल्या असशील. दे तुझ्या माथं उकलाच्या बाकसाची चावी !

**बे०**—ही घ्या चावी ! पण मी सांगते त्या तेथें नाहींत. आईनें त्या कांहीं मला दिल्या नव्हत्या. उगीच चार दिवस घालण्यासाठीं दिल्या होत्या.

**शा०**—लबाड कोठची. तूं त्या तिच्याजवळ मुद्दाम नेऊन दिल्यास. बोल. आणतेस कां नाहीं ? चल-घे शाल. चल (इतक्यांत खंडेराव व सोनाबाई आंतून येतात.)

**खं०**—अरे शामराव हे हाय तरी का ? अरे हें कोळ्या कुलवाड्याचं घर हाय का गरस्थाचं घर हाय ? भरले ओळीन हे का तुफान हाय ! अन् हे रोजचे-रोज तंटे न कज्जे कशाचे ?

**शा०**—दादाजी, नवराबायकोच्या तंट्यामध्यें तुह्मीं पडूं नये. तुह्मी आपले गुपचीप बसा. जा. तुमचं इकडं काय काम आहे ?

**खं०**—कां ? माजे घरान न तूं मला चीप बसाला सांगणार-माजं इकडे काय काम हाय ? अरे तूं पोर मला शिकवतेस ?

**सो०**—अरे पण शामराव त्यांचे तोंडीं लागूं नको !

**शा०**—दादी तूं मध्यें बोलूं नकोस. ह्मातारी माणसं सगळ्यांमध्यें बोलायला लागलीं तर मग त्यांचा मान तो कसा राहणार ?

**खं०**—अरे बैला तूं शुद्धीवर हायस कां छाकटा हायस ! तूं ह्मातारा कणाला बोलतेस ? मी ह्मातारा ? अरे मी ह्मातारा ? ह्मातारा तुझा बापूस ! ह्मातारा तुझा आजूस ! नको सांगूं तूं. (बेनाबाईस) बेने, का ग, हें का तुफान हाय ?

**शा०**—खबरदार एक शब्द बोलशील तर ! दोन थोबाडांत देईन.

**खं०**—अरे ! माजे घरांन न माजा अपमान ! न तो पण माजे पोटचे पोराकडून ! ( सोनाबाईस ) अग ए, पायलास का तुजा पोर कसा पराकरमी निघाला तो ?

**सो०**—अहो तुमी तरी पड खा ! तो एक मूर्ख झाला ! पण तुमाला तरी विचार हाय का नाय ! ( शामरावास ) शामराव, अरे हाच का तुजा शहाणपणा ? अशीच कारे तूं आमची वडिलांची मर्यादा राखणार !

**शा०**—हे बघ दादी ! जर तुम्हांला आपला मान ठेवून घ्यावयाचा असेल तर तुह्मी आत्तांच्या आतां जा पाहूं येथून जा--

**खं०**—अरे तूं जा–जा म्हणूण कणाला सांगतेस ?

**शा०**—तुह्मांला–तुह्मांला–( इतक्यांत )—

**सो०**—अरे पण शामराव, तूं तरी तोंड आवर. कशेरे अशे तुमी ? कोणीच ऐका नाय ! ( खंडेरावास ) तुमाला तरी तोंड आवरता नाय का ये ? तुमी चुप बसा. मी सगळ विचारतय–

**खं०**—( रागानें ) का त्या गाढवाला विचाराच हाय ! करतशेल त्या बिचारीचा उगीच छळ ! बेहय्या पोर कोठचा. भर वळीतले घरान असं तुफान कराला शरम नाय वाटे ? सकाळचे सकाळ मी गाढवाला हाकून देतंय घरानशी ! मगशी उघडतील डोळे ! चल–माला त्याच तोंड पावसं वाटेनाय ! (जातो).

**सो०**—शामा–ए हाय तरी का ? सांग बा—

**शा०**—कांहीं नाहीं— ( वेनाबाईकडे बोट करून )–हिला पहिल्यानें घरांतून हांकून लाव पाहूं कशी ती–

**सो०**—कां ? असं का तिजून केलंय ?

**शा०**—तें मी कांहीं सांगायला बसत नाहीं. बोल, हिला हांकून देतेस कीं मी चालता होऊं घरांतून ?

**सो०**—अरे पण, असं तिजून का केल ते अगोदर सांगशील का नाय ?

**शा०**—कांहीं करो अगर न करो ! मला ही घरांत अगदीं नको. या क्षणीं गेली पाहिजे–आतांच्या आतां. बोल, तुला मी पाहिजे कीं ही सटवी पाहिजे ?

**सो०**—अस वेड्यासारख का बोलतेस तू तरी ! तुज पोराच ऐकून मी जनामदी हसवण करून घेव का ? अन लोक तुला पण हंसणार नाय का ?

**शा०**—( रागानें ) मी लोकांच्या हंसण्याची बिलकूल परवा करीत नाहीं. बोल–हिला जा ह्मणून सांगतेस का करूं मी माझं काळं ?

**सो०**—बरं–बरं–तूं आत इकडशी जा. मी सांगतय तिला जावाला.

**शा०**—( संतापानें ) सांगतय–बिंगतय कांहीं नाहीं. ( बेनाबाईस ) अग ए, घे शाल—हो चालती आतांच्या आतां. खबरदार पुन्हां या घरांत पाय ठेवलास तर ! कायग–ए–ऐकतेस कीं नाहीं.

**सो०**—( शामरावाच्या हनुवटीस हात लावून ) अरे पण माझं ऐकशील का नाय ? मी तिला पाठवतय. तूं जा. तिला जेव घालतय न पाठवतय. अवडे रात्री उपाशी कशी पाठवू !

**शा०**—बरं आहे तर. मी जातों. पण—

**सो०**—बरं–बरं–जा–जा–माझे बा–जा. ( शामराव चडफडत चालता होतो ). पराकरमीरे बाबा निघालास ! ( बेनाबाईस ) काग, अवड झालं तरी का ?

**बे०**—कांहीं नाहीं. आईनें दिलेल्या बांगड्या मागीत होते.

**सो०**—पण तू ते दिल्या नायस न ? मगशी हे तंटे न रुसवे कणाचे ?

**बे०**—मी नाहीं तंटा केला.

**सो०**—अग हो ! तूं कशाला तंटा कराला पायजेस ! माझाच सोकरा तंटेखोर ! तूं अगदीं भोळी ! भल्याचं बोंड !

**बे०**—शपथ मी कांहीं बोललें असेन तर !

**सो०**—बरं–बरं–झाला तंटा तो थोडा झाला ! आतं तुझा माझा नको होवाला ! जा–जेवा जा–न रामाचे बरोबर ओंवाळा ! रा चार दिवस तिकडेच–त्याला पण कोठे चैन पडाच हाय ! सकाळ बोलवाला धाडील ! पण तिकडे सगळ सांगाला नको हो ! त्याचा सभावच असा; त्याला का कराच ! उद्यानां नवरा बायको एक व्हाल ! लोकांनां सोभा मातर दाखवाची ! अकला हान कोठें ! उगीच नाय बाय, चार चौघान वागाच ! आमी अशा असतु ते त्यांचे बरोबर अवडी वरस काढली नसती अब्रूमदी ! त्यांचे सभावाचा नवरा पायजे होता ! तुमी ते दोन दिवसान धिंदवडे केलसते ! बरं. रात होते. जा—

**बे०**—( स्वगत ) शेवटीं माझ्याच माथ्यावर खापर फुटलं ! पण त्यांनां तरी दोष कां देऊं ! आपलंच नशीब फुटकं ! अजून तरी किती हाल व अपेष्टा कपाळीं आहेत तें कोणास ठाऊक ! असो ! देवाची मर्जी ! ( जाते. )

---

## प्रवेश १३ वा.

[ **स्थळ**—सुंदररावाचें घर ]

( सुंदरराव एका कोचीवर पडले आहेत. )

**सुं०**—देवा. या त्रासांतून मला मुक्त कर. कर्जाच्या चिंतेनें त्याचप्रमाणें संसाराच्या घोरानें मला रात्रंदिवस चैन कसें तें पडत नाहीं. मला सांप्रत सुख तर काडीएवढें नाहीं पण दुःख पाहिलें तर पर्वताएवढें आहे. स्वतःचें सुख एकीकडेस राहिलें, पण पोटच्या पोरांबाळांचें तरी सुख ! तेंही नाहीं ! एक तर नवरा न मिळाल्यामुळें झुरून झुरून गेली. दुसरीचें नांवाला मात्र लग्न लागलें–तिला पाहिलें तर नवऱ्यापासून काडीचें सुख नाहीं. आमच्या जांवईबुवांचे दररोज नवे नवे पराक्रम ऐकण्यांत येतात. काल काय दारू पिऊन रस्त्यांत पडले ! आज काय जुगारांत पकडतां पकडतां वांचले ! याप्रमाणें दररोज कांहीं ना कांहीं तरी आहेच ! बरें, हे ढंग बाहेरच्या बाहेर असते तरी पतकरते. पण तसेंही नाहीं ! घरांतही त्याचप्रमाणें ! बायकोस वालभरही सोनें करण्याची आशा नाहीं. उलट लग्नांत घातलेले थोडे बहुत दागिने होते तेही पार ! असो, त्याचा आतां खेद करून काय उपयोग ! आपणच मुलाविषयीं विशेष चौकशी न करितां त्याच्या पदरीं आपल्या गरीब मुलीला बांधली ! ही माझ्या गृहसुखाची स्थिति ! कर्जानें तर जेरीस आणलें. चाकरी होती ती देखील देवास सहन झाली नाहीं. त्या मारवाड्यामुळें पेनशन घेणें भाग पडलें ! बरें ! दुसरा कांहीं धंदा करावा तर आंगीं शक्ति राहिली नाहीं ! आज पंधरा दिवस झाले तापानें अगदीं बेजार करून सोडलें आहे. ईश्वरा ! या सर्व त्रासांतून मुक्त करणार तूंच एक समर्थ आहेस ! एकदांचे डोळे मिटीव ह्मणजे झालें !

( इतक्यांत बेनाबाई एका गड्याबरोबर येते. )

( बेनाबाईस ) कांग बेनू, तूं एवढ्या रात्रीं इकडे कां आलीस ?

**बे०**—( रडत ) काय सांगूं बाबा माझं कपाळ ! ( काशीबाई आंतून येते. )

**का०**—कांग बेनू, तूं इकडे ग कोठें ?

**बे०**—बाबा–आई–( रडूं लागते. )

**का०**—अग पण झालं तरी काय ? अशी रडतेस कां ?

**बे०**—आई मी काय सांगू ! आतां तुम्हीं मला तारा किंवा मारा—मला तुमच्या इथें ठेवा किंवा घरांतून हांकून द्या—मला या पुढें त्यांच्या इथें जायचं ह्मणून नाहीं !

**सुं०**—अग पण असं झालं तरी काय ?

**बे०**—व्हावयाचं तें झालं—मी मोटी झालें म्हणून आपला त्रास काढून टाकण्याकरितां मला एखाद्या गरीब गाईप्रमाणें कसाबाच्या स्वाधीन केलीत. दुसरं तें काय ? त्यांच्या पदरीं बांधण्यापेक्षां मला ठार केली असतीत तरी बरं झालं असतं !

**सुं०**—हाय ! हाय ! आईबापांनीं एवढें करूनही त्यांसच ना शेवटीं बोल ! असो ! पण बेने झालं तरी काय ?

**बे०**—बाबा, व्हावयाचं तें काय आणखी ? घरांतील दागिन्यांस आग लावून माहेरचे दागिने आणण्यास सांगत होते.

**सुं०**—एवढेंचना ? त्यांनीं सांगितलें म्हणून काय झालें ? तूं कोठें त्यांनां नेऊन दिलेस ? आणि आपणांपाशीं तरी दागिने आहेत कोठें ? छेः एवढ्याशा क्षुल्लक कारणासाटीं तुला सासरचा कंटाळा येणें हें माझ्या मतें योग्य नाहीं ! वेडी कोटची ! हें तूं काय केलेस ?

**बे०**—पण बाबा, माझं सगळं ह्मणणं ऐकून तर घ्याल ? मी इतकी वेडी आहें काय, कीं एवढ्या क्षुल्लक कारणासाटीं सासर सोडून येथें येईन ? आई, तूं मला झिटकारून टाकशील पण मी तुझ्यापाशीं पदर पसरून मागतें कीं मला क्षमा करण्याचे वचन दे ! माझ्या हातून तुझा एक मोठा अपराध घडला आहे !

**का०**—बेने, माझ्या तोंडास काळिमा आणण्यासारखें तर तूं कांहीं केलें नाहींसना ?

**बे०**—आई, त्याविषयीं तूं निर्धास्त रहा. तसं कांहीं माझ्या हातून या जन्मीं तर घडणार नाहीं !

**का०**—मग दुसरा असा कोणता अपराध तुझ्या हातून घडला ?

**बे०**—आई, पण तूं मला झिटकारून टाकणार नाहींस ना ?

**का०**—अग पण सांग तर खरी !

**बे०**—( आईस बिलगून ) आई—

**सुं०**—अग पण तूं इतकी भितेस कां ? बोल—चल आमची काळजी दूर कर.

**बे०**—आई, तुझी वाळी—

**का०**—काय, माझी वाळी घालविलीस ( तिला झिटकारते )

**बे०**—नाहीं आई. मीं ती त्यांनां दिली—

**का०**—वाळी–माझी दोन हजारांची वाळी ! कोठेंगमीं इला वाळी दिली ! मेले तुझी अक्कल कोठें गेली होती. माझ्या वाळीला आग लावलीस ती ? चल मेले माझ्या घरांतून. मला तूं आतां नको. कर तुझें तोंड काळं. चल हो चालती !

**बे०**—आई–बाबा–आई पण माझं ह्मणणं तूं ऐकून तर घेशील ? मी खरोखर सांगतें, जर तूं माझी सर्व गोष्ट ऐकून घेशील तर मजवर इतकी निष्ठूर होणार नाहींस !

**का०**—मेले मी तुझं कांहींएक ऐकणार नाहीं ! माझी वाळी तूं बऱ्या बोलानें आणून दे. कारटे, तुझ्याच पायगुणानें माझ्या सर्व संसाराचे सोहळे झाले ! एवढचं काय तें कमी होतं–तेंही तूं पुरं केलंस ! चल कशी ती ! घे शाल आणि हो चालती !

**बे०**—आई तूं इतकी निष्ठुर होऊं नकोस ! बाबा, आईची समजूत करा ! माझें ह्मणणें ऐकून घ्या आणि मग तुह्मांस वाटेल तशी माझी वाट करा !

**का०**—मेले आतां तुझी वाट केलीच समज ! चल–घरांतून चालती हो कशी ! मला तुझं तोंड पाह्यच नाहीं.

**सुं०**—( काशीबाईस ) अग पण ती काय ह्मणते तें ऐक तर खरी !

**का०**—जळळे मेले कारटीचे शब्द ऐकण्यास मी खुषी नाहीं ! तुह्मींच घ्या त्या कारटीचं बोलणं ऐकून.

**बे०**—बाबा–आई–शनिवारीं रात्रीं त्यांनीं मजजवळ वाळी मागितली. पहिल्यानें मीं साफ नाहीं ह्मणून सांगितलें व थोडी फजितीही केली ! परंतु दोन दिवसांत परत आणून देईन असें सांगितल्यावरून, माझ्या मनांत विचार आला कीं, ही त्यांनां सुधारण्याची चांगली संधि आहे. ह्मणून मीं त्यांना सांगितलं कीं, जर तुह्मी सर्व व्यसने एकदम सोडून देण्याचं वचन द्याल तर तुह्मांस थोड्या दिवसांसाठीं वाळी देतें. त्याचप्रमाणें त्यांनीं वचन दिलं व मीं त्यांस वाळी दिली—

**का०**—पण मेले ती वाळी तुझी होती का ?

**बे०**—आई ती माझी नव्हती खरी, पण मीं ती त्यांस पोरबुद्धीनें दिली. मीं त्यांच्या वचनावर भरंवसा ठेवला. पुन्हा, मला वाटलं कीं तुझी व बाबांची कशी तरी समजूत करतां येईल. आणि त्यांत, जर कां ते वचनाप्रमाणें चालले, तर तशा शेकडों वाळ्या करतां येतील, असाही विचार माझ्या मनांत आला.

**का०**—चोर तर चोर आणि तशांत शिरजोर! मेले, आणखी दोन जन्म घेतले तरी त्यांजकडून अशी एकही वाळी होणार होती काय?

**बे०**—आई, नकोग मला अशा निष्ठुर शब्दांनीं मारूं. मी पदर पसरून मागतें कीं माझा इतका अपराध माफ कर. मी पोरबुद्धीनें फसलें गेलें. पण त्यांनां वाळी देण्यांत माझा हेतु कोणता याचा विचार कर!

**सुं०**—तुझा हेतु चांगला खरा, परंतु जी मूल्यवान् वस्तु तूं आपल्या नवऱ्यास देऊन टाकलीस ती तुझी नसल्याकारणानें ती कोणासही कोणत्याही कारणाकरितां द्यावयास तुला अधिकार नव्हता. पण असो. झाली गोष्ट परत येत नाहीं. ( उसासा टाकून ) माझेंच दुर्भाग्य त्यास तूं काय करशील! आज दोन हजारांची वाळी व्यर्थ गेली! हा लहान सहान तोटा झाला नाहीं!

**का०**—कोठें रे मला या कारटीला माझी वाळी देण्याची बुद्धि झाली! त्या दाण्यासारखे आतां दाणे मिळतात तरी काय?

**सुं०**—आणि मिळत असले तरी विकत घेण्याची आपणांस शक्ति कोठें आहे? एवढी वाळीच काय ती राहिली होती! तीही दैवास सहन झाली नाहीं. असो ईश्वराची इच्छा!

**का०**—हो! हातीं करावं आणि दैवास रडावं!

**सुं०**—अग पुरे कर आतां. तिला दुःखावर डाग देऊं नकोस. बरं पण बेनू, तुला एकाएकीं येथें येण्याचें कारण काय?

**बे**—त्यांनीं मला घरांतून जा ह्मणून सांगितलं.

**सुं०**—कोणीं? सासूनें किंवा सासऱ्यानें?

**बे०**—नाहीं.

**सुं०**—तर मग कोणी, नवऱ्यानें?

**का०**—सांगायला–काय झालं! होतं नव्हतं तेवढं घेतलं–आतां कांहीं राहिलं नाहीं, तेव्हां घरांत तरी कशाला पाहिजे!

**सुं०**—तुला त्यांनीं कां बरं जा ह्मणून सांगितलं!

**बे०**—( आईस ) तुझ्या तासीव बांगड्या आणायला सांगत होते, त्यावरून.

**सुं०**—बरं पण तूं येथें आलीस हें तुझ्या सासुसासऱ्यांस ठाऊक आहे का ?

**बे०**—हो, त्यांच्या समोरच मला त्यांनीं हांकून लाविली.

**सुं०**—मग तुझ्या सासूनें किंवा सासऱ्यानें कांहीं ह्मटलं नाहीं ?

**बे०**—त्यांचं ऐकतो कोण ! दादीबाई पुष्कळ बोलल्या. दादाजीही पुष्कळ रागावले. पण त्यांचं ऐकतो कोण !

**सुं०**—हं, एकूण राजश्री प्रतापी खरे ! बरं बेनू तूं जेवून आली आहेस ना ?

**बे०**—हो—

**सुं०**—जा तर आतां—स्वस्थ झोंप घे. उद्यां सकाळीं आपण या गोष्टीचा विचार करूं भिऊं नकोस. माझा जीव आहे तोंपर्यंत मी माझ्या पोराबाळांस अंतर देणार नाहीं. माझ्या मागें त्यांचें नशीब ! (काशीबाई व बेनाबाई आंत जातात.)

**सुं०**—(उसासा टाकून) झाली आतां कमाल झाली ! आहेत तेवढीं दुःखें कमी होतीं ! आपल्यापाठीं दैव हात धुवून लागलें आहे यांत संशय नाहीं ! छेः यांतून मी पार कसचा पडतों ! सर्वस्वीच नाश झाला ! इतकी उचापत करून एकदाचं लग्न लावून दिलं, त्याचे हे असे सोहळे !! (एकाएकीं छातींत वेदना झाल्यामुळें ) आई—आई—मरतों रे—मरतों आई—(बेशुद्ध होऊन पडतो.)

( आंतून सर्व मंडळी धांवत येतात व सुंदररावासभोंवतीं उभी रहातात. )

**का०**—( रडत रडत ) हाय ! हाय ! देवा हें आणखी काय ?

**बे०**—( रडत रडत ) बाबा—बाबा—तुह्मी बोलत कां नाहीं ?

**बा०**—( रडत ) आई—बाबा असं हें काय करितात ? त्यांनां काय झालं ? ( उपचार करितात. )

**सुं०** —( शुद्धीवर येऊन ) अं—भिऊं नका. मी सावध आहें ! अग तूं इकडून जाऊं नकोस. येथेंच उभी रहा. बेनू तूं ही येथेंच अस. माझ्या लाडक्या मुलांनों या. मला एक वेळ भेटा. आतां मी एक दोन घटकांचा पाहुणा आहें असं मला वाटतं ! ही पहा माझी जीभ कोरडी पडत चालली ! हा पहा माझा ऊर भरत चालला ! आतां मी तर चाललों ! या जगांत जें कांहीं सुख ह्मणून भोगायचं तें सर्व भोगलं. त्याचप्रमाणें शेवटीं शेवटीं दुःखही पुष्कळ अनुभवलें. माझ्या दुःखाबद्दल मला एवढें वाईट वाटत नाहीं. परंतु या माझ्या बायकोचें व या दीन

मुलांचें माझ्या पाठीं मागें काय होईल याची मला मोठी चिंता पडली आहे. अग तुझ्याकरितां तसेंच या अनाथ मुलांकरितां मी कांहींच तजवीज करून ठेविली नाहीं हें पाहून मला फार दुःख होतें. पण त्यांत माझा कोणत्याही रीतीनें अपराध नाहीं हें तुह्मीं जाणत आहांच. एक वर्षापूर्वी मी चांगला जवान होतों; परंतु संसाराच्या व कर्जाच्या काळजीने मी थोड्या काळांतच ह्मातारा होऊन गेलों ! आणि सरतेशेवटीं मी हुंडा मागण्याच्या दुष्ट चालीस बळी पडत आहें. माझा सर्व प्रकारें नाश होण्यास हीच चाल कारण ! असो ईश्वराची इच्छा ! त्याच्या इच्छेप्रमाणें व्हावयाचें तें झालें. या माझ्या दुःखपरिणामक चरित्रापासून तरी आमच्या जातींतील लोकांचे डोळे उघडावे व असे दुःखदायक परिणाम होऊं न देण्याविषयीं त्यांनीं उपाय योजावे हें मी ईश्वरापाशीं मागून घेतों. असो. माझ्यानें आतां विशेष बोलवत नाहीं. शक्ति नाहीं. माझे हातपाय थंड पडत चालले—आतां माझें तुह्मांस एवढेंच सांगणें आहे कीं—( कांहीं वेळ स्तब्ध रहातो. ) अग मी तर आतां तुह्मांस सोडून चाललों ! माझ्यानंतर या माझ्या लाडक्या परंतु अनाथ मुलांचा सांभाळ कर ! त्यांस अंतर देऊं नकोस. बेनूस पूर्ण क्षमा कर. तिने पोरबुद्धीनें केलेला अपराध आपण जर पोटांत न घातला तर मग तिनें दुसऱ्या कोणाकडे पहावें ? दुर्दैवेंकरून तिला नवऱ्यापासून असावें तसें सुख नाहीं. तर तिला तुझ्याकडून तरी सुख मिळुं दे. बेनू, तुला विशेष तें काय सांगावयाचें आहे ! तूं शहाणी आहेस. कांहीं दिवस येथें राहून मग तूं आपल्या सासरीं जाऊन रहा. तुझें कल्याण होईल. तुझा नवरा सुधरेल हा माझा तुला आशीर्वाद आहे ! या वेळीं तुला देण्यासारखें माझ्याजवळ हेंच ! आहा ! माझ्या लहानग्या बाळा ! तुझी काय अवस्था होईल ? ये बेटा—मजजवळ ये.(रडतो)

**बा०**—बाबा—तुह्मी रडतां कां ? तुह्मीं असें काय ह्मणतां ? तुह्मीं कोठें चाललेत ?

**सुं०**—बाळा—मी—आतां तुह्मां सर्वांस सोडून—देवाच्या घरीं जात आहें—तुझा सांभाळ यापुढें तुझी—आ—आई—करील. मला—आ—आ—णखी—आ—आ—युष्य—असतें—तर—( छातींत वेदना येते. ) अग—आई—मा—मा—झ्यानें—आतां—बोल-वत—ना—नाहीं. मी—म—म—मरतों. उ—उगी—रडूं—न—नको—बे—बेनू—उ—उगीर—र—र—रा—रा—राम. ( प्राण सोडतो. )

**[ अंक दुसरा समाप्त. ]**

# अंक ३ रा.



## प्रवेश १ ला.

( **स्थळ**—सुंदररावाचें घर. )

( काशीबाई आंतल्या खोलींत स्वयंपाक करीत आहे. बेनाबाई एका कोचावर वाचीत बसली आहे. इतक्यांत कापडवाला चिंतोपंत येतो. )

**चिं०**—( बाहेरून ) आंत कोणी आहे काय ?

**बे०**—कोण आहे ?

**चिं०**—( बाहेरून ) मी चिंतोपंत कापडवाला. आंत येऊं का ?

**बे०**—थांबा, दरवाजा उघडतें. ( दरवाजा उघडून आंत चिंतोपंतास घेते ) बसा. आई स्वयंपाक करीत आहे. आई—

**का०**—( आंतून ) कोण ग बेनू ?

**बे०**—आई, ते चिंतोपंत आले आहेत.

**का०**—(आंतूनच) त्यांना सांग आज तुम्ही जा. व पुढल्या आदितवारीं या.

**चिं०**—( अंमळ रागावून ) हें काय बरं असं काशीबाई ? पैसे द्यावयाचे असतील तर द्या; नाहीं तर नाहीं ह्मणून सांगा. धर्म केला असें समजून स्वस्थ बसेन. उगीच हे धक्के कशाला देतां ?

**का०**—( बाहेर येऊन ) चिंतोपंत, कांहो तुह्मी सगळे माझ्या गरीबाच्या पाठीमागें असें लागलां आहां ? तुह्मींच पहा, त्यांनीं एक अरदी तरी पाठीमागें ठेविली आहे काय ? आतां हें त्यांचें सगळें कर्ज मी देऊं तरी कोठून ( बेनूस ) जा ग बेनू, थोडेसे त्यांतले तांदूळ निसून ठेव. ( बेनू आंत जाते. )

**चिं०**—बाई, तें सर्व खरें; पण आह्मीं जो माल दिला त्याचे पैसे नकोत का आह्मांला ? काशीबाई, आह्मी अशी सर्वांवर दया करीत बसलों तर आमचा धंदा कसा चालणार ? तशांत तुह्मीं ह्मणतां तशी गोष्ट असलीच तर मग उगीच या उडवाउडवीच्या गोष्टी तरी कां सांगतां ? विनाकारण आमच्यासारख्या धंद्याच्या माणसास हेलपाटे तरी कशाला देतां ? अहो एकदांचे नाहीं ह्मणा—ह्मणजे मिटली कटकट !

**का०**—मी त्याला काय करूं ! माझा उपाय नाहीं. माझ्याजवळ द्यावयास नाहीं, तर मी देऊं तरी कोठून ?

**चिं०**—हें पहा काशीबाई, मी माझी रकम एकदमच मागत नाहीं. दर महिन्याचे महिन्यास पांच पांच रुपये जरी दिलेत, तरी एक वर्षांत सगळी रकम फिटून जाईल.

**का०**—असे कितीजणांना तरी पांच पांच रुपये देऊं ? चिंतोपंत, तुह्मीं एकटेच मागणारे आहां काय ? पहा चिंतोपंत, या सर्व गोष्टीचा विचार करा. तुह्मांलाही मुलेंबाळें असतील. माझ्यावर दया करा व असेच कांहीं दिवस थांबा. मी कांहीं त्यांना होईल तोंपर्यंत नरकांत जाऊं देणार नाहीं. पुढें ईश्वराची मर्जी.

**चिं०**—( नाखुशीनें ) बरं तर. मीं आतां जातों. पण पुष्कळ दिवस लावूं नका म्हणजे झालें— ( चिं. जातो. )

**का०**—इतकं समजावून सांगितलं तरी ह्मणे पुष्कळ दिवस लावूं नका. त्याला तरी काय ह्मणून दोष द्यावा ! आपलंच दुर्दैव–दुसरं काय—

( इतक्यांत भाडेवाला परदेशी येतो )

**प०**—क्यौं काशीबाई—

**का०**—कायरे बाबा–तूं आज कां आलास ?

**प०**—क्या पूछते हो–तूं आज कां आलास ?–उघराणी करनेकु आया. और क्या. बाई, सेठ बोला आज दस महिने का भाडा चढगया है सो जलदी निकाल करना.

**का०**—बाबा, शेटनां सांग, आतां फार दिवस भाडें ठेवीत नाहीं. भिऊं नका.

**प०**—क्या ' भिऊं नका. भिऊं नका. ' पैसा देने की ताकद नही तो कायकु इतनी भारी जगामें रेहेते हो ? जगा खाली करो. चालीमें जाकर रहो.

**का०**—बोल–बाबा–बोल. ते असतांना तुझ्या शेटची बोलण्याची ताकद नव्हती–तो तूं नोकर आज मला असा टाकून बोलतोस.

**प०**—नही बोलेगा तो क्या करेगा ? अमारा शेठ धरम करनेकु नहीं बैठा. शेठ बोले भाडेका निकाल करो—नही तो टांच लगाकर सब सामान लेकर जाएंगे.

**का०**—अरे देवा हें आणखी काय ! बाबा, शेठला सांग माझीतर अशी स्थिति आहे. यावर तुला बरें दिसेल तें कर. जा, जीं कांहीं भांडीं कुंडीं व या दोन चार जिनसा आहेत त्या जा घेऊन. जा, नव्याणव तेथें पुरे शंभर !

**प०**—अच्छा ! अच्छा ! पन दुसरे महीनेसे घर जरूर खाली करना—समजा नही तो जुल्मसे—

**का०**—जा—बाबा—जा. नको दुःखावर डाग देऊं. ( परदेशी जातो. )

( बाळा पाकीट हातांत घेऊन शाळेंतून परत येतो. )

**बा०**—( पाकीट खालीं ठेवून ) आ—आई—मला भूक लागली—कांहीं खायाला दे.

**का०**—( जवळ घेऊन ) काय बाळा देऊं तुला खायाला ! ती सकाळची भात शाक ठेविली आहे ती खा. जा बच्चा.

**बा०**—हं हं—ती नको मला. मला साखरपाला पाहिजे. आमचे शाळेंतला तो जयकर कसा साखरपाला घेऊन येतो शाळेंत—तसा दे. आणि आई, बाबा होते तेव्हां कसे चांगले गरम गरम खाकरे करून घालीत होतीस—तसे कां नाहीं आतां करीत ?

**का०**—अरे! अरे! आतां या बाळास मी काय सांगूं? बाळ आजचा दिवस तर खा; उद्यां खचीत तुझ्यासाठीं साखरपाला करून ठेवीन बरं.

**बा०**—पण आई, मला तें इतिहासाचें बुक नाहीं अजून दिलंसग ? आज बूक नव्हतं ह्मणून मास्तरनीं लास्ट नंबर दिला व दोन छड्या मारल्या.

**का०**—हाय ! हाय ! काय हे हाल ! बरं बाळा, तुला तें पण उद्यां देईन हं. जा ! खा जा ! ( बेनूस ) बेनू—अग बेनू—बाळाला तो सकाळचा भात ठेवलय तो दे—अन त्या मोठे वाडग्यांतली थोडीशी शाक दे. ( बाळा जातो. )

**का०**—झालं आतां कमाल झाली ! देवा ! आतां मी काय तरी करूं ! हे लांडगे एका पाठीमागें एक असे आले ह्मणजे माझें हृदय कसे फाटून जातें. यांचे पैसे कोठून तरी देऊं ? सगळे बारा रुपये पेन्शन येणार. तें तरी त्यांना काय बुद्धि सुचली असेल ती असो, दोन वर्षांवरच घेतलें. तेंही नसतें तर झोळी घेऊन दारोदार भीक मागण्याचा प्रसंग आला असता. पण तेवढ्यांतून

माझा निभाव कसा लागणार ! भाडें, खाण्याचा खर्च बाळाची फी, बुकांचे पैसे, हें सगळें त्यांतच कसें होणार ? शिवाय त्यांचे मरणाकरितां काढलेलें कर्ज तेंही कसें फिटणार ? काय करूं—आतां कोठें जाऊं ? रिलीफफंडाची मदत मागूं ? ( विचार करून ) काय ! त्यांचें कुळ काय ! त्यांचे नांव काय ! माझ्या बापाचा लौकिक काय ! असे माझे सासरचे व माहेरचे !—त्यांची मी काशीबाई—धर्माच्या फंडाची मदत—हें जळळं पोट पेटवण्याकरितां मागूं ? नको—नको—देवा असा वेळ आणूं नको. ( विचार करून ) पण तसं न केलं तर पुढली वाट काय ? भला माझ्या स्वतःविषयीं पर्वा नाहीं. मी एकटी असतें, तर खुशाल कोठेंही मोलमजुरी करून पोट भरतें—पण बाळयाचं कसं होईल ! त्याच्या शाळेची फी व बुकांचे पैसे व आजपर्यंत त्यानें भोगलेलं सुख मी त्यास कसं देऊं ? त्याच्या शिकण्याकरितां रिलिफफंडांतून सोय होण्यासारखी नाहीं काय ? बारा रुपड्यांत मीटभाकर खाऊन कसं तरी पोट जाळीन. तसाच प्रसंग आला तर शिवणकाम करूनही त्यांत भर घालीन; पण रिलिफफंडाच्या मदतीनें जर बाळयास चांगली विद्या मिळाली व पुढें तो नांवालौकिकास आला तर अजूनही मला पुढें सुख मिळणार नाहीं काय ? आमची नुसतीं पोटें भरण्यापेक्षां त्या फंडाचा उपयोग बाळयासारख्या निराश्रित मुलांस विद्याभ्यास करण्याच्या कामांत मदत करण्याकडे केला तर किती बरं चांगलं होईल ! व त्या योगानें, शिकण्यास उत्सुक, परंतु पैसा नसल्यामुळें ज्यांस विद्याभ्यास करतां येत नाहीं, अशा किती तरी मुलांस विद्यादान दिल्याचें श्रेय रिलिफफंडवाल्यांस मिळणार आहे बरं ? पण असं होईल का ? प्रयत्न तर करून पहावा ! पुढें लाज राखणार परमेश्वर आहे ! ( काशीबाई जाते. )

---

## प्रवेश २ रा.

( **स्थळ**—खंडेरावाचें घर. )

[ **खंडेराव व धाकलाभाई** ]

**खं०**—अरेपण, मीजुन तुला एक वखत सांगितलंन का माजे जवळुन तुला एक अरदीपण नाय मिळाची ह्मगून ? चालला विलायतला ! मोटा गवंडरचा नातु पडलास कां नाय !

**घा०**—मग तुमचे जवळ इतका पैसा असून काय कामाचा ! तुमच्यापेक्षां गरीब असतात ते देखील पाठवितात आपल्या मुलांना विलायतेस.

**खं०**—माजे जवळ पैसा ? नायरे बा ! पण बाबा माजे, तूं विलायतला जाऊन जास्त ते का कराचा होतास ?

**घा०**—मला ब्यॉरिस्टर व्हावयाचं आहे.

**खं०**—अवडच्च न ? मग इकडे नाय का बालिस्टर होता येत ? अन बालिस्टर होऊन तरी का कराचं ? रोब घालून कोरटामदी माशा मारीत बसाच्च तेच्च का नाय ? हे बग धाकलाभाय, पुष्कळ झाला अभ्यास. आत एकादी चाकरी बिकरी बगा. लगीन बिगीन करून खुशाल संसार कराचा ते सोडून चालला विलायतला ! वेडा कोठचा !

**घा०**--नाहीं–नाहीं–तुह्मी पाठवाच मला--

**खं०**—वेडा हायस तूं. कोठें चाललास विलायतला ? तिकडे धरम नाय काय नाय. त्या मलेंछांचे हातच खावाच. छेः मला नाय ते पसंत.

**घा०**—अंः त्याच्यांत काय झालं ? सगळंच कसं साधतं ! आणि तशांत कांहीं धर्म अधर्म होईल त्याबद्दल आल्यावर प्रायश्चित्त घेतलं ह्मणजे झालं.

**खं०**—वाः वाः ते बर आपलं सोपं झालंय. सगळं कराव न मगशी लागावं देवपूजेला ! तूं पण सध्याचे पोरांसारखा झालास का ? पितान का नाय आपलीं पोरं इराण्याचे कडचा च्या ! पाव बिसकूट ते घरोघर झालीच ! सोवळ ओवळ ते गेलच्च ! लगनाचे जेवणान पण ओवळ्याशी बसाला लागले ! गेली ! गेली असं करून आपले जातीची बरकत अगदी नायशी झाली ! अन या भिकारी दशेला येऊन पोचलुं ! नाय ते अगोदरचे लोकांनां कशी बरकत होती ! अरे तुमी सगळा धरम बुडवाल–बुडवाल. धरम बुडाला ! पोशाक पण सोडाला लागले ! तुला पायजे का नाय शर्ट न पाटलून न बुट घालाला ! जसा का सायबाचा पोर !

**घा०**—( हंसून ) ह्मणजे, ड्रेसमध्यें देखील धर्म आहे वाटतं ?

**खं**—अरे हो ! डरेसमंदी धरम नाय ह्मणून का झाल ? पण आपला चांगला सोईचा, सोबणारा, जुने काळानचा, थोडे पैशान होणारा, भारकूम पोशाक

टाकून तो भिकारडा, छिछोर, बसतांना उठतांना अडचण करणारा पोशाक कणाला पायजे ! या आमचे पोशाकान भारकुमपणा कसा येते ! नांय ते तुमी, इपिमिनेट दिसता—इपिमिनेट !

**धा०**—तसं असेल ! पण दादाजी मीं काढलेल्या गोष्टीचं कसं काय ?

**खं०**—अरे कशाची गोष्ट घेऊन बसलयस ! वेडा हायस तूं. हे बग, तूं या गोष्टीचा नाद दे अगदीं सोडून. एक ते माजे जवळ पैसा नाय. त्यांन तिकडे जाण्यामदी मोठा अरथ हाय अस पणकाय नाय. बालिसटर होवाचच असेल ते इकडे नायका होता येत ? तो तेलंग विलायतला गेलता का ? अरे तो जडज झाला—जडज ! अन हे बग, माहीमदी कनाय तुज लगीन कराचा माजा विचार हाय.

**धा०**—अहो लग्न होईल पुढें. लग्नाची काय घाई आहे ?

**खं०**—घाय नाय घाय नाय ते कव लगीन करणार ? ह्मातारा झाल्यावर ? वेडा कोठचा. हे बग धाकलाभाय, तो विनायकराव चारशेर सोन न दुसरी चांगळी रीत देवाला तयार हाय. सोकरी पण चांगली हाय हो ! जशी गोरीनची कीड !

**धा०**—दादाजी मी तुह्मांला स्पष्ट सांगतों, मला तर एव्हां लग्न करणें नाहींच. म्हणून तुह्मी या भानगडींत पडूं नका. तशांत, हुंडा घेऊन तर मी कधींच लग्न करणार नाहीं ! त्याविषयीं पाहिजे तर तुमचीच शपथ—

**खं०**—हं हं धाकलाभाय ! हे तू काय बोल्तेस ! सोडून घे बगु ती शपथ ! अरे हे भिकेचे डोळे कसे होतान तुला ! हुंडा नाय घेवाचा ! मगशी तुमचे पोराबाळाचा खरच कोण चालवील ? तुमाला का चाकऱ्या धंदे हान ? गाढवानो, या रीती आमी घेतो त्या आमचेसाठीं नाय घेत. तुमचेचसाठीं. तुमचे पोराबाळाचा खरच चालला पायजे न !

**धा०**—( मनांत ) वाः कसं जस्टीफाय् करिताहेत ! ( उघड ) हें पहा दादाजी, जर तुह्मी म्हणतां तशी गोष्ट खरी आहे, तर मुलास चाकरी लागून त्यास स्वताच्या बायकोचें व मुलाबाळांचीं पोटें भरण्यास शक्ति येईल तोंपर्यंत अविवाहित कां ठेवीत नाहीं ? लग्न करण्याची घाई कां करतां ? तसं झालं तर मग त्याच्या बापावर त्यांच्या उदरपोषणांचा बोजा पडणार नाहीं. व मग हुंडा घेण्याचें कारणही रहाणार नाहीं.

**खं०**—( रागानें ) अरे जा जा—माला ह्मातान्याला अवडासा पोर शिकवाला आला ! बाब्या चार पायीं उतरला ! हुंडा घेवाचा नाय ! तुजे सोकऱ्याचे वेळीं नको घेव पायजे ते ! मीं कध्धीं घेतल्याबगर रावाचा नाय !

( जातो )

**धा०**—दादाजींनीं तर मला दोन्ही बाजूंनीं अडवून धरलं. विलायतेस तर जाऊं देत नाहींत व येथेंही स्वस्थ राहूं देत नाहींत ? माझ्या इच्छेविरुद्ध चोपून हुंडा घेऊन व माझा विक्रय करून माझें लग्न यंदाच करून टाकण्याचा त्यांचा निश्चय झाला आहे असें दिसतें ! मी कितीही सांगितलें तरी हे माझें ह्मणणें ऐकतील असं मला वाटत नाहीं ! ठीक आहे तर ! माझाही निश्चय झाला ! विलायतेस तर जावयाचं व लग्नही टाळावयाचं. चला—त्याच विचारास ताबडतोब लागलं पाहिजे. लग्नाची तयारी चालण्याचीं चिन्हें तर दिसूं लागलीं आहेत. हं, होऊं द्या लग्नाची कडेकोट तयारी ! आपणही आपली तयारी करावी !

( जातो. )

---

## प्रवेश ३ रा.

( खंडेरावाचें घर. )

( मंडपांत पुण्याहवाचनाचें साहित्य मांडण्यांत कांहीं ब्राह्मण गुंतले आहेत. )

**व्यंकय्या०**—कृष्णंभटजी, तो गंध उगाळून ठेवला ?

**कृष्णंभट**—हो ! त्या कंचोळ्यांत देखील घालून ठेवलें.

**व्यंकय्या०**—अहो, ते होमाचा ब्राह्मण अजून नाहीं आला ?

**कृष्णंभट**—येतील. पुष्कळ वेळ आहे अजून. यजमान कोठें तयार आहेत !

**व्यंकय्या०**—अहो त्यांना बरोबर सात वाजतां बोलावला ! पण अजून ठिकाण नाहीं. आठ वाजून गेला. काय मस्करी करतो. आपणांस वेळ नसतो तर कबूल कशाला करतो ? साफ नाहीं कां नाहीं सांगतो. तुमचा दक्षणी ब्राह्मण असाच ! बोलावल्या वेळेस कध्धी नाहीं येतो.

**कृष्णंभट**—आणि तुमचा तेलंगु ब्राह्मण मात्र वेळेवर येतो. हं ?

( इतक्यांत आंतून खंडेराव पीतांबर वगैरे नेसून येतात. )

**खं०**—कसं का भटजी, कोठपर्यंत आलं ?

**व्यं०**—हं आमचा तयारी आहे. तुमचाच खोटी असतो.

**खं०**—का बोलता आमची खोटी ? अवो सुवेर येवाची भीती हाय, लवकर आटपाचं म्हणून पहाटेस या, असं सांगतां सांगतां माजं तोंड पण दुखलं; पण सात वाजले तरी कोणी एकाजुन पण तोंड दाखवलं नाय. आले बाजीरावासारखं सात वाजल्यावरती–तंबाखु चावीत चावीत. (एका भटास) अवो भटजी, ह्या वेळ पान खावाचा का ? अवो हे तोंड हाय का तोबरा हाय ? टाका थुकून बगु पान सुपारी ती–टाका–(भट पानसुपारी थुंकून येतो.)

**व्यंकय्या०**—पण दादाजी आमचा काय यांत वांक असतो ? तुमचा उपाध्या आह्मांला वर्दी देतो त्याप्रमाणें आह्मीं येतो.

**खं०**—तुमी सगळे सारखे ! तुमाला यजमानाची परवा कोठें हाय ! ते आमचे उपाध्ये अजून कोठें आल्यान ? येतीन सगळ आटपल्यावरती. बर चला, तिला बोलावा लवकर—

**व्यंकय्या०**—कृष्णंभटजी–आंतोन दादीबाईस बोलावतो–जलदी जातो.
(कृ० जातो.)

**खं०**—अरे ही अजून का करतय ? अन तो धाकलाभाय तरी कोठें हाय ? जा बगु तुमी व्यंकय्या. तुमचे बगर काम होवाच नाय.

**व्यंकय्या०**—(धांदलीनें) हे आम्ही चालले–आतां घेऊन येतो.
(व्यंक० जातो.)

**खं०**—(कांहीं वेळानें) अरे हीं येतान का नाय ? व्यंकय्या–व्यंकय्या—
(व्यंकय्या घाबऱ्या घाबऱ्या येतो)

**खं०**—का व्यंकय्या, हे हाय तरी का ?

**व्यंकय्या०**—(कानावर हात ठेवून) आपणांला कांहीं नाहीं समजतो. दादीबाई घाबरतो. सर्व इकडून तिकडे धांवतो ! फार गडबड होऊन जातो.! ते पहा सर्व इकडेच येतो—(सोनाबाई इत्यादि मंडळी येतात.)

**खं०**—का ? हाय का ? अवडी गडबड कणाची ?

**सो०**—का सांगूं माझं कपाळ ! (दागिन्यांची पेटी पुढें टाकून)—या पेटींनचे दागिने सगळे गेले !

**खं०**—ह्मणजे ? पेटींन दागिने नाय ? अग वेडी हायस, कोठे दुसरे पेटींन बिटींन ठेवलसहील–जा–शोध जा–तुला विसर ह्मणजे का देवाचे घरचा !

**सो०**—अवो नाय वो ! याच पेटींन काल ठेवल्ते.

**खं०**—मग पेटींनच असतील ते. जातीन कोठें ? आण बगु पेटी इकडे. ( खंडेराव पेटी उलथून पालथून पाहतो. ) पेटींन ते नाय ! मग दागिने गेले कोठे ? अग–दागिने गेले कोठे ?

**सो०**—तें मी का सांगूं !

**खं०**—तूं नाय सांगणार ते कोण सांगेल ? माझा बाप ? अग पण सगळं देसक बगितलस का ? ठेवलसशील डावे हाताशी कोठेंतरी !

**सो०**—अवो नाय वो, सगळं देसक शोधून बगीतलं. बगाच काय पण बाकी ठेवल नाय !

**खं०**—बगाच काय पण ठेवल नाय ! अरे ये शामराव बघतेस का ? आण पोलिसला बोलावून. तोंड का बगता तुमी ?

( इतक्यांत वामनराव आंतून येतो. )

**वा०**—दादाजी—हें घ्या धाकलाभायचं पत्र. वाचा—

**खं०**—अरे आज तुमची सगळ्यानची अक्कल गेली तरी कोठें ? धाकलाभायच पत्र माला वाचाला देतेस ? दे त्याला नेऊन.

**वा०**—अहो तसं नाहीं हो. हें पत्र धाकलाभायनें तुम्हांला लिहिलंय.

**खं०**—ह्मणजे–तो कोठें हाय ?

**सो०**—त्याला सकाळपासून चोखळवण्यासाठीं सोधतान पण तो हाय कोठे ! कोठे गेलय कणाला खबर !

**खं०**—आण कोठें हाय तें पत्र बगु. ( पत्र घेतो व उघडून वाचतो. ) घात झाला ! अग घरानचाच चोर ! या धाकल्याजुन माजा गळा कापला ! अग ये–तो तुजा कारटा–सगळे दागिने बिगीने घेऊन विलायतला गेला. अरे ! अरे ! का करूं ? आणारे माजे कपडे, मी आतं जातय त्याचे मगारी ! आणतय त्याला मुसक्या बांधून. कायरे ? कपडे आणतां का नाय ?

**शा०**—पण दादाजी काय आहे तें आम्हांला सांगाल तर खरं.

**खं०**—अरे तुमांला पोरांनां का सांगाचं ? ( पत्र फेंकून ) **वाच हें पत्र.**

**शा०**—( पत्र वाचून ) मग आतां त्याच्या पाठीमागें कसे जाणार ? त्याची आगबोट सकाळींच हांकारली असेल—

**खं०**—बस्स बोलला ! विघ्नसंतोषी कोठचा ! तुमाला मोठ्या मोठ्या गोष्टी कराला सांगा. गाढव एक उपयोगी पडासारखा नाय–तुमाला काय ! गेलं तर माजं गेलं. तुमचं काय गेलं ! तुमी मजा बगाला तयारच ! काय करूं रे ! पोलीसला रपोट करूं न आणवूं पकडून त्याला ?

**सो०**—( घाबरून ) नको नको–तवढ नको करूं. माजे दागिने गेले तरी पतकरले पण तसं काय नको करूं.

**खं०**—का, दागिने गेले तरी पतकरले ? अग तूं सुद्धीवर हायस का ? का बोलतेस ? अग ते दागिने तूं कमावाला गेलतीस का ? मोटी शाणी !

**वा०**—पण दादाजी आतां उगीच डोकं तापवून जिवाला त्रास करून घेण्यांत काय अर्थ आहे ? जाऊं द्या ! दागिने गेल्यानें आपलं दैव तर गेलं नाहींना ?

**खं०**—अरे दैवाची का गोष्ट सांगतेस ! त्या दागिन्यावरोबर माजा प्राण—माजा जीव गेला–माजा जीव !

**वा०**—अहो पण आतां बोलून काय उपयोग ?

**खं०**—अग पण पेटींन का का दागिने होते ?

**सो०**—माझे दिडाशेराचे तोडे–दोन शेरांची वेळ–बारा तोळ्यांचं गाठलं अन् समोरचे गंगाबायचे दीडा शेराचे वाळे.

**खं०**—( घावरून ) अं—गंगाबायचे वाळे ? झाला ! माजा सर्वस्वी नास झाला ! अग हे आतां भरून देव कोठून ? घरांनचे ते घरांनचे जाऊन हा वरती दंड ! अग, त्या धाकल्याचं तूं सदा सत घालततीस न ? अग, तो तुजे गळ्यांनचा ताईत होतानं ? मगशीं हें कसं केलं त्याजुन ?

**सो०**—त्याचे मनांनच माला का खबर ! मी बिचारी भोळी ! माला त्याचें मनांन अवढ कपट होतं हें खबर असतं तर लगीन कशाला उभारलसतं ? झाली आतां फजिती सगळेपरी !

**खं०**—अग फजितीची कणाला पर्वा हाय ? पण हा दंड कसा भरूं ? अं काय करूं रे !

**शा०**—दादाजी आतां झाली गोष्ट परत येत नाहीं–तुह्मीं स्वस्थ बसा !

**खं०**—अरे, माजे आंगाची होळी चाललय अन् स्वस्थ बसा, स्वस्थ बसा, ह्मणून का सांगतयस ! बरोबरच हाय ! 'आंगा वेगळा घाय–त्याच तुला काय !'

**शा०**—असं काय ह्मणतां दादाजी ? अहो हा जो तोटा झाला तो आमचा देखील नाहीं का झाला ? आह्मांला त्याबद्दल कांहींच का वाईट वाटत नसेल ?

**खं०**—बरं ! बरं ! चला आतां इकडशी. इकडेच राहून काय होणार ? याची कशी का तजवीज कराची त्याचा विचार केला पायजे !

( इतक्यांत गलासवाला **कासम** आंत येतो. )

**कासम**—दादाजी–उद्याला किती गलास लागतील ? आज पान्चसे तयार केल्यात. दोन झुंबर लावाचे न ?

**खं०**—( रागानें ) फेकून दे ती तुजी गलास. आग लाव त्यांना !

**शा०**—( गलासवाल्यास बाजूस बोलावून ) तूं आतां बाहेर जा. मग मी तुला सर्व सांगतों. ( गलासवाला जातो. )

( गाडीवाला येतो. )

**गा०**—शेठ, ही चिठी दामोदर शेठनी दिलय. एक गाडी भरून नारळ आणल्यात. हेल तुमापासन घेन्यासनी सांगीतलय. नारळ कोठे टाकायचे ?

**खं०**—( संतापानें ) टाक भरतींत नेऊन ते नारळ ! अरेरे ! हा सगळा खरच बोकांडी बसला ! अरे धाकल्या, तुला लगीन नव्हतं कराचं तर अगोदरशींच का नाय उघड सांगितलंस ? सगळी तयारी झाल्यावरती न अवढा खरच केल्यावरती असा दगा दिलास ! बुडलुं–मी साफ बुडलुं ! अरे–मी जळ्लुं–मी पेटलुं ! अरे–माजं सोनं–माजं सोनं !! ( दादाजीस सर्व मंडळी समजवून आंत घेऊन जातात. )

**अंक तिसरा समाप्त.**

---

# अंक ४ था



## प्रवेश १ ला.

### [ रंगी नायकिणीचें घर. ]

**रंगी**—( कांहीं वेळ हारमोनियम वाजवून ) आठ वाजले तरी शामरावाची स्वारी अजून कां बरें आली नाहीं ? म्हटलं असतां ते यापूर्वी यावयाचे. मंगेश देखील अजून आला नाहीं. सोनाराकडे चौकशी करायाला म्हणून पाठविला त्याला इतका वेळ तो कशाला लागावा ? त्या मंगेशाला जरा कोठें बाहेर पाठविला ह्मणजे तो लौकर ह्मणून कध्धीं परत यावयाचा नाहीं. शामराव यावयाच्या पूर्वी येईल तर बरं होईल. ह्मणजे आजच्ं आजच निकाल करायला चांगलं. नाहीं तर उद्यांवर गेलं. काय चमत्कार आहे ! आज सतत तीन महिने झाले. शामरावांकडून तोडे मागतें—पण आज देतों—उद्यां देतों—सोनाराला सोनें आणून दिलें आहे—अशा थापांवर थापा मारताहेत. पण मला तर वाटतं कीं ही सगळी उडवाउडवीची गोष्ट आहे. शामरावाला म्हणावं कीं तूंच आपल्या आईचं दूध प्याला आहेस असं समजूं नकोस. मी कांहीं अगदींच भोळी नाहीं. माझ्या मनांत केव्हांच संशय येऊन चुकला आहे व त्याविषयीं खुलासा करण्याकरितां मंगेशाला सोनाराकडे देखील पाठविला आहे. दिलं असलं तर ठीक. पण जर का तसं नसलं तर मग एका घावानें दोन तुकडे. मला काय वाण ! जोंपर्यंत यौवनाचा भर आहे तोंपर्यंत हजारों लोक माझ्या पायाशीं लोळतील ? आणि शामरावाशीं संबंध तोडून टाकावा हेंच बरं—अलीकडे त्याला पैशाची ओढ लागलीशी दिसते. पगारही वेळेवर पोहोंचत नाहीं—तर अशाशीं आतां संबंध ठेवून मला काय लाभ ! चला आजपर्यंत त्याच्याकडून मिळालें तेवढें खरें—आतां जास्ती मिळण्याची आशा नको ! तर त्याला सोडून एखादा पैसेवाला पाहिला पाहिजे ! पाहायाला कशाला ? तो जमनादास शेट माझ्याकडून हो मिळण्याची खोटी कीं आलाच पायां पडत ! ठीक तर हाच विचार नक्की ! ( मंगेश येतो. ) कायरे मंगेशा, तूं केव्हांचा गेला होतास ! एवढा वेळ तो कशाला लागला ? येथून ढेंगभर देखील जायचं नव्हतं.

**मंगेश०**—ताई, तुझी की नाहीं सगळ्या कामांत उतावळ. अग येथून जायला ढेंगभर नव्हतं पण तो सोनार दुकानावर मिळेल तेव्हां ना ! तो गेला होता बाहेर. आला तेव्हां विचारून आलों.

**रं०**—अरे आज सोनार नव्हता दुकानावर. पण तुला केव्हांही कामाला पाठविलं म्हणजे असंच.

**मं०**—बरं तर असंच तर असंच. पुन्हा नको पाठवूं पाहिजे तर. मला तर या कामाचा कंटाळा आला ! घटकाभर मला स्वस्थ बसूं देत नाहींस ! हें कर—तें कर—इकडे जा—तिकडे जा—यांतच माझा सारा दिवस जातो.

**रं०**—बरं पण त्या सोनारानें काय सांगितलं ?

**मं०**—सोनाराजवळ सोनं बिनं कांहीं दिलं नाहीं.

**रं०**—हं. ठीक आहे तर. शामरावजींनां ह्मणावं पहा आतां तुमची मजा !

**मं०**—ह्मणजे ग ?

**रं०**—ह्मणजे तेंच. मला शामरावाची सोबत नको !

**मं०**—काय ह्मणतेस ? त्याची सोबत नको ? आणि ती काय ह्मणून ?

**रं०**—काय ह्मणून काय विचारतोस ? तुला समजत नाहीं ! त्याच्याबरोबर मीही भिकारी होऊं का ?

**मं०**—छेः ! छेः ! ताई हें तुला शोभत नाहीं. ज्यानें आज दिवसपर्यंत तुला एवढा ऐवज करून दिला, जो तुझ्यासाठीं एवढा जीव टाकतो—त्याच्याशीं असा बेइमानपणा करणें ठीक नाहीं. असेल सध्यां त्याचा हात ओढींत. आज नाहीं उद्यां—देईल करून—त्यांत काय !

**रं०**—अरे आहे तें सगळं त्यांतच आहे. हें पहा, आमच्या सारख्यांना काय. जो दागदागिने—कपडालत्ता—पैसाटक्का भरपूर देईल त्याच्या आम्ही. अशा भुके कंगालाजवळ राहून काय करायचं ! पुढें भीक मागायची ! यांच्या बरोबर आपला काय जन्म निघायचा आहे ! हे काय, यौवनाचा भर आहे तोंपर्यंतच हांजी हांजी करतील. पुढें मग कोण विचारणार ! आपला आपल्यालाच पुढला विचार नको का पहायला ?

**मं०**—छेः ! ताई, जे विचार एखाद्या हलक्या खानदानीच्या वेश्येस देखील शोभणार नाहींत ते तुझ्यासारख्या अस्सल खानदानीच्या व प्रत्यक्ष माझ्या बहिणीच्या तोंडून ऐकण्यास मला फारच वाईट वाटतं. अग आज सहा वर्षें

ज्यानें एवढा पैसा खर्चून—स्वतांच्या अब्रूची नासाडी करून—तुझ्याबरोबर सोबत ठेविली त्याचा त्याला अशा रीतीनें मोबदला देणें मला तर अगदीं अयोग्य वाटतं.

**रं०**—त्यांत त्यानें मोटं नवल तें काय केलं ? व हें सर्व कांहीं माझ्या उपकारासाठीं केलं नाहीं. स्वतांच्या मजेसाठीं, व अशी मौज कांहीं मोफत मिळतच नसते !

**मं०**—हें तुझें बोलणें ऐकून मला मोठें नवल वाटतें. व तुला माझी बहीण ह्मणण्यास देखील मला शरम वाटते. अग आपळी खानदान केवढी अब्रूदार ! अग तुझ्या आईनें वेश्येच्या कुटुंबांत जन्म मात्र घेतला परंतु मरेपर्यंत एका धन्याशिवाय दुसऱ्या कोणाकडे ढुंकून देखील पाहिलें नाहीं. तिचं वर्तन गरती स्त्रियांस देखील लाजविण्यासारखं होतं, समजलीस.

**रं०**—समजलं—समजलं—असंच करून शेवटीं मेली तेव्हां एक फुटकी कवडी देखील ठेविली नाहीं. केली धन्याची भर—

**मं०**—त्यांत काय वाईट केलं ! ज्याचं घेतलं त्याला दिलं.

**रं०**—बरं ! बरं ! तिला बरं वाटलं तसं केलं तिनें—म्हणून मीही तसं करावं असं नाहीं. तूं मला कांहीं ह्मण—मी पैशाची !

**मं०**—आग लाव त्या पैशाला. पैसा कांहीं बरोबर घेऊन जावयाचा नाहीं—अब्रू राहिली ह्मणजे झालं !

**रं०**—अरे कशाची अब्रू आणि कशाचं काय घेऊन् बसला आहेस ? बोलून चालून आह्मी वेश्या ! आह्मांला अब्रू ती कसली आली !

**मं०**—ठीक तर. तुझा असाच जर विचार आहे तर मग काय ! घे चैन मनासारखी भोगून ! आज शामरावास सोडशिल व तसाच दुसरा एखादा पैसेवाला पाहून त्याच्याशीं रहाशिल. पण त्याच्याजवळ तरी कोठें तूं टिकणार आहेस ? त्याचा पैसा खलास झाला ह्मणजे तिसरा आणखी शोधशील ! ठीक—ठीक—या—प्रमाणें जन्मभर असंच रहाटगाडगं चालायचं.

**रं०**—बस ! बस ! फार शहाणा होऊं नकोस ! मी माझ्या स्वतांची मालकीण आहे ! तुझ्या नादीं लागून भीक नाहीं मागायची !

**मं०**—( मनांत ) अंतीं तोच प्रसंग येणार ! वेश्यांच्या धंद्यांत देखील इमान आहे. तें जिनें सोडलें तिचे हाल कुत्रा देखील खाणार नाहीं ! ( उघड ) बरं तर.

तुला जर माझ्या सांगण्याप्रमाणें ऐकायचं नसलं तर मग माझी तुझ्याजवळ राहून शोभा काय ? मला हें असें कध्धीं सहन व्हायचं नाहीं. तुझे असे विचार पाहून माझें आतांच पित्त खवळून गेलें आहे, व माझ्यानें या डोळ्यांनीं असे चाळे कध्धीं पाहवणार नाहींत. ह्मणून मी ह्मणतों मी आपला उद्यां गांवीं जातों. खुशाल शेतभाती करून तेथें राहीन ! तूं इकडे मार हवी तशी चैन. पण ध्यानांत ठेव—करशील तसं भरशील.

रं०—बरं—बरं—जा ! उद्यांबद्दल आजच कां जाईनास. (मं० जातो )

(शामराव येतो. त्यास पाहून रंगी बाजूस टेबलाजवळ तोंड फिरवून उभी रहाते.)

शा०—( कोचावर बसून ) रंगे—अहो रंगाजी—अहो रंगाजीराव—कां आज दूरच कां ? या अशा बसा तरी येथें—

रं०—(दुरुनच) येतें हो थांबा. पण अगोदर ते तोडे आणलेत कीं नाहीं तें सांगा पाहू.

शा०—( हंसून ) हं ! हं ! तोडे का ? हो हो. अहो, तुमच्यापेक्षां तोडे का जास्ती आहेत ! एक सोडून पांच जोड येतील. हं ! हं !

रं०—( मनांत ) एकाची इतकी पंचाईत आणि रावसाहेब ह्मणतात पांच जोड ! जरा गंमत तर करावी. मग आपल्याला जें काय करायचं तें शेवटीं आहेच ! ( उघड ) हं खरंच. तुमच्या सारखे करून देणारे भेटले ह्मणजे मग आह्मांला वाण कशाची !

शा०—हं कसं बोललीस ! पण काय ग अजून दुरून दुरूनच कां ? जवळ नाहीं का यावयाचं ?

रं०—पण कांहो ते तोडे कोठपर्यंत आले आहेत तरी ? परवां ह्मणालेत कीं तास द्यावयाचा काय तो राहिला आहे—

शा०—हो. गाढव आळशी अगदीं—आज तीन दिवस झाले, अजून तास मारून होत नाहीं. गाढवाला काम उरकत नव्हतं तर पतकरलं कशाला ?

रं०—खरंच. या दुनियेत अशीच पुष्कळ माणसं—काम करण्याची ताकद नसली तरी तें काम करण्याचं कबूल करून—थापावर थापा देऊन लोकांना शेवटीं फसवितात !

शा०—( मनांत ) हें हिचं बोलणं मला लागून आहे वाटतं ? खरी गोष्ट तर हिला समजली नाहींना ? छेः ! ती कशी समजणार ! तशांत समजली असती

तर हें असं हास्यमुख दृष्टीस पडतं का? तर हा संशय खोटा. ( उघड ) हो त्यानं तसं पूर्वीच सांगितलं असतं तर दिले असते दुसऱ्या कोणाजवळ–तो नाहीं तर त्याचे बाप हजार!

रं०—( मनांत ) कशी बतावणी चालली आहे ही! तेवढ्या कामांत स्वारी हुशार खरी! ( उघड ) पण तुह्मी तरी त्याच्या दुकानावर जायचे होतेत. त्याच्या पाठीमागें लागल्याशिवाय तो कसचं काम करून देतो.

शा०—मग तुझ्या मनांत काय त्याचे दुकानीं मी गेलों नाहीं वाटतं? वा! अग रोज दोन तीन फेरे घातल्याशिवाय रहातों का? हा आतां तेथूनच आलों.

रं०—( मनांत ) शर्थ झाली! पुरे झाला आतां विनोद. आतां खरं स्वरूप प्रगट करावं, दुसरं काय. ( उघड ) हें पहा शामराव, तुह्मी थट्टा सोडून द्या. खरं सांगा. त्या सोनाराकडे सोनं खरंच नेऊन दिलंत का?

शा०—ह्मणजे यांत काय संशय! अग मी स्वतः नेऊन दिलं–स्वतां—

रं०—हें पहा. तुह्मी उगीच लबाडी कशाला करतां? मला खरी गोष्ट अगोदरच कळून चुकली आहे. तर आतां लबाडी करण्यांत हांशील काय—

शा०—( मनांत ) माझा संशय शेवटीं खराच झाला. हिला खरी गोष्ट कळली यांत संशय नाहीं, आतां बतावणी करून काय उपयोग? खरं सांगितल्यानें डोकं तर उडवीत नाहीं. (उघड) हे पहा रंगे—(जवळ जाऊं लागतो.)

रं०—( दुरून ) हं. हं. दुरून जे कांहीं बोलायचं असेल तें दुरून बोला. जवळ यायची जरूरी नाहीं.

शा०—अग पण असं काय करतेस? एवढा राग कां? ( जवळ जातो. )

रं०—एकदां सांगितलं ना कीं दुरून बोला ह्मणून? हें काय निर्लज्जासारखं?

शा०—हं हं! हें काय असं–इतका राग–आणखी माझ्यावर!

रं०—ह्मणजे तुह्मी कोण मोठे आलेत बाजीराव!

शा०—रंगे—

रं०—खबरदार रंगे ह्मणाल तर–आजपासून मी तुह्मांला रंगी नाहीं.

शा०—बरं तर, रंगाजी ह्मणतों–झालं?

रं०—कांहींही ह्मणा. मला त्याची बिलकूल पर्वा नाहीं.

शा०—अग पण ऐकशील तर खरी.

**रं०**—काय ऐकायचं आतां ? शंभर लबाड्या सांगितल्या त्यांत ही आणखी एक.

**शा०**—अग पण असं काय करतेस ? हा एवढा राग तोड्यांसाठींच ना ? ह्मत्याच्या, तोडे काय हं हं ह्मणतां आणून देतों. मग तर झालं ना ?

**रं०**—मला तुमचे तोडे नकोत आणि कांहीं नको. झालं तेवढं पुरे झालं. मला आतां तुमचा संबंध नको—

**शा०**—हं हं ! हें काय ह्मणतेस ? छेः ! छेः ! असं कधीं होईल का ? आणि तेंही माझ्या रंगी—माझ्या रंगाजीच्या हातून ? कधीं नाहीं ! ( हंसतो. )

**रं०**—( रागाचा आव आणून ) दांत काढायला शरम नाहीं वाटत ! चला व्हा येथून चालते ! जवळ पैसा नाहीं तर हे डौल पाहिजेत कशाला ! जा, तशीच एखादी भिकारडी पाहून तिच्या बरोबर चैन मारा ! माझ्यासारखीला ठेवायचं फुकटचं नाहीं !

**शा०**—तूं आज शुद्धीवर आहेस

**रं०**—मी चांगली शुद्धीवर आहें. तुह्मीच आले असाल दारू ठांसून ! नाहीं-तर एवढे बोललें तरी लोचट मनुष्यासारखे येथें उभे राहिले नसतेत.

**शा०**—अग पण आज दिवसपर्यंत जें सर्व मी तुझ्यासाठीं केलें—दागदागिने दिले—स्वतांच्या बायकोस रिती करून तुझी भर केली—आईबाप—भाऊबंद यांची पर्वा न करितां व जनलज्जेची तिळमात्र भीति मनांत न बाळगतां तुझ्या ठायीं लंपट होऊन राहिलों त्याचा हा असा मोबदला तूं मला देणार काय ? पहा या गोष्टीचा नीट विचार केलास ?

**रं०**—अहो चला, विचार बिचार कसचा घेऊन बसलेत ! केलंत त्यांत नवल तें काय मोठं ! स्वतांच्या आगीसाठीं केलंत ! त्याचं मला काय ?

**शा०**—अरे अरे ! हें मी आज काय ऐकतों ! अग, कालपर्यंत जी माझ्याशीं गोड गोड भाषणें करीत होती, जी 'तुमच्याशिवाय मला चैन पडत नाहीं' असें वारंवार ह्मणत होती, जी 'आपल्यावर माझें अतोनात प्रेम आहे' असें शपथा आणा घेऊन वरचेवर सांगत होती, जी 'तुमच्याबरोबर मी जन्मभर राहीन' अशीं वचनावर वचनें देत होती—ती तूंचना रंगे ?

**रं०**—हो हो ती मीच ! आमच्या धंद्याची ती एक खुबीच आहे. पुरुषास भुरळ पाडून—त्याच्याशीं गोड गोड बोलून—वर वर प्रेम दाखवून—त्याच्याजवळ असेल

नसेल तें सर्व काढून घेऊन–त्यास जी भुकेकंगाल न करील तिला वेश्या हें नांव कसें शोभेल ? आतां तरी समजलेत कीं यापेक्षांही उघडपणें सांगू ?

**शा०**—नको ! नको ! पुरे झालें ! पण रंगे–हें पहा–झाली गोष्ट विसरतां नाहीं का येत ? पहा विचार कर–नको ग इतकी निष्ठुर होऊं. पहा माझ्याकडे तरी पहा !

**रं०**—पाहिलं–पाहिलं–चला जा येथून–माझ्या येथें पाय ठेवूं नका–खबरदार पुन्हा आलेत तर.

**शा०**—अग पण—

**रं०**—मुकाट्यानें जातां कीं नाहीं ? कीं सर्वांसमोर शोभा करून घ्यावयाची आहे ?

**शा०**—नको ग असं करूं–पहा–अग मी तुझा शामराव—

**रं०**—छेः तुह्मी बऱ्या बोलानें नाहीं जाणार ! कोण आहेरे तिकडे ?

**शा०**—नको ! नको बोलावूं कोणाला ! मीच आपला होऊन जातों. पण रंगे—

**रं०**—चल मेल्या–लोचट कोठचा–मेल्याजवळ फुटकी कवडीदिखील नाहीं आणि नायकीण ठेवायला पाहिजे ! (सपात काढून) घे हें त्याचं बक्षीस—

(सपात उडाविते. सपात लागून शामराव अडखळून पडतो. त्याबरोबर रंगी दुसरें सपात उडविण्यास पहाते. शामराव झपाट्यासरसा उठून खालीं उतरतो.)

---

## प्रवेश २ रा.

[ **स्थळ**—रंगीच्या घरासमोरील रस्ता. ]

( शामराव रंगीच्या घरांतून घाईघाईनें बाहेर पडतो. )

**शा०**—शेवटीं तिनें माझी अशी शोभा केली हं ! अरे काय करूं रे ! तिच्या नरडीचा घोट घ्यावासा वाटतो. माझ्या हातांत अधिकार असता तर त्या धगडर्चिं नाक कापून तिची धिंड काढली असती ! काय करूं. या वेळीं जर का माझ्याजवळ कांहीं असतं तर आतांच जाऊन तिची चांगली खबर घेतली असती ! मला सर्वस्वी नागवून शेवटीं तिनें माझी निर्भर्त्सना करून अशा रीतीनें हांकून दिलें. हं ( पुढें चालून व विचार करून ) पण तिचा तरी त्यांत काय वांक ! मीच मूर्ख कीं तिच्या नादीं लागलों ! ( पुढें जाऊन व कांहीं वेळ विचार करून ) उघ-

डले—माझे डोळे साफ उघडले ! रंगे, तूं माझ्या डोळ्यांत असें कांहीं जालिम अंजन घातलेंस कीं, त्या योगानें—माझ्या डोळ्यावर आजपर्यंत आलेला पडदा साफ उघडून मला निराळीच दृष्टि प्राप्त झाली आहे. कितीरे मी मूर्ख ! हिच्या नादीं लागून मी माझ्या गरीब निरपराधी बायकोचा व्यर्थ छळ केला ! नानातऱ्हेनें तिला दुखविलें. परंतु या दोघींमध्यें फरक पहा कसा तो ! रंगीची मी इतकी भर केली तरी एवढ्याशा क्षुल्लक कारणावरून ती बेइमानी होऊन तिनें माझ्याशीं एका क्षणांत संबंध तोडून टाकला. पण तीच माझी बायको पहा ! तिला सर्व रीतीनें त्रास देत असतानांही व तिला माझ्याकडून कवडीचेंहि सुख नसतां तिचा जीव माझ्यासाठीं रात्रंदिवस इळहळतच आहे ! अहा ! या खोट्या हिऱ्याच्या बाहेरील चकाकीला भुलून गेल्यामुळें त्या खऱ्या रत्नाची मला आजपर्यंत परीक्षा झाली नव्हती ! कितीतरी मी अधम ! असो. झालें तेवढें पुरे झालें ! दारू, जुगार व रंडीबाजी या व्यसनांत अगदीं गर्क होऊन मी आपली खराबी करून घेतली. पैशापरी पैसा घालवून अब्रूही गमाविली ! व इतकेंही करून जिच्यावर माझा पूर्ण विश्वास तिनें माझा केंसानें गळा कापला ! हर ! हर ! माझें निरंतर हित चिंतणारा माझा मित्र विश्वासराव यांच्या सांगण्याकडे दुर्लक्ष करून जर मी निर्लज्जपणें या विषयांच्या आधीन झालों नसतों तर आजचा असा हा प्रसंग आला असता काय ? पण आतां त्याविषयीं खेद करून काय उपयोग ! झाली गोष्ट परत येत नाहीं ! आतां पुढें तरी असल्या छंदांत न पडण्याची खबरदारी ठेविली पाहिजे. काय चमत्कार आहे पहा ! एवढ्याशा लहान वयांत केवढा हा पराक्रम ! बरं झालं ! ही एव्हांच ठेंच लागली ह्मणून बरं झालं. नाहीं तर एकदां का या व्यसनांनीं आपला पूर्ण पगडा मजवर बसविला असता—मग कोणत्या थरास गोष्ट गेली असती तें सांगतां येत नाहीं. खचित त्यांनीं मला दुनियेंतून उठविलेंच असतें ! अहाहा ! परमेश्वरा ! तूं माझे लवकरच डोळे उघडलेस याबद्दल तुझें आभार मानावे तितके थोडेच ! असो. रात्र बरीच झाली. पहिल्यानें विश्वासरावाकडे जाऊन त्याला सर्व हकीकत सांगतों—व नंतर घरीं जाऊन तिचे पाय धरतों व झालेल्या अपराधाबद्दल क्षमा मागून पुढें नीट चालण्याविषयीं शपथ घेऊन टाकतों म्हणजे झालें ! अहाहा ! हें ऐकून तिला किती तरी आनंद होईल ! नाचेल—नाचेल—ती आनंदानें नाचेल !

( शामराव जातो. )

## प्रवेश ३ रा.

[ **स्थळ**—खंडेरावाचें घर—शामरावाची खोली. ]

( बेनाबाई खोलींत निजली आहे. शामराव आंत येतो. )

**शा०**—( बेनाबाईजवळ जाऊन ) अग ए ऊठ–ऊठ–अशी आळशासारखी निजलीस काय ? किती वाजले ?

**बे०**—( उठून डोळे चोळीत उभी रहाते. ) काय मेला हा तुमचा त्रास तरी ! बारा वाजायला आले–तुमचं ठिकाण नाहीं–वाट पाहून पाहून थकलें व निजून गेलें–जरा कोठेंसा डोळा लागला तों आला यांचा त्रास. बरं आलेत ते आलेत. आणखी कांहीं थाळी पिटायला नको होती—

**शा०**—अग पण अशी चिडलीस कशाला ? मी तुला असा नेहमीं का उठवितों ?

**बे०**—तर मग आजच काय माझ्याशिवाय अडलं होतं ? निजायचे होतेत खुशाल !

**शा०**—तूं किंनाही अलीकडेस माझ्यावर अशीच कारणाशिवाय ओरडतेस. कारण असो किंवा नसो. तुझ्याकडून कध्धीं ह्मणजे गोड शब्द मिळाला असं नाहीं.

**बे०**—अहाहा ! काय बोलणं तरी ! जसं काय कोणाला खरंच वाटेल ! अग बाई, माझ्या गोड शब्दाची गरज आहे कोणाला ! गोड गोड शब्दांनीं मोहून टाकणाऱ्या त्या दुसऱ्याच. जा–जा. अशीच कोणी तुमची वाट पहात बसली असेल ! ऐका तिच्याकडून गोड शब्द पोट भरून—

**शा०**—अग पण तुझ्याकडून ऐकावयाची इच्छा झाली असली तर ? तूं नाहींना बोलणार ?

**बे०**—( मनांत ) आज असा काय बरं रंग दिसतो ? नेहमींची चर्या कांहीं दिसत नाही ! आणि स्वारी आज रंगलेली देखील दिसत नाहीं. नाहींतर या वेळेला तोंडाला घाण यावयाची. काय असेल ते असो. ( उघड ) हो ! न बोलून कसं चालतं ! आह्मीं बोलून चालून बायकाच—पुरुष सांगतील त्याप्रमाणें निमूटपणे केलंच पाहिजे !

शा०—छेः छेः तसा मला जुलमाचा रामराम नको. मला तुझ्याकडून मनापासून दोन गोड शब्द ऐकावयाचे—

बे०—तेवढी मात्र आशा करूं नका—

शा०—तें कां बरं ?

बे०—तें तुमच्याच मनाला विचारा—

शा०—अग पण तें कोणत्या मनाला विचारूं ?

बे०—ह्मणजे ? माणसाला दोन चार मनं असतात वाटतं ?

शा०—तसं नाहींग—मन तर एकच—पण माणसाच्या मनाच्या स्थितीमध्यें कितदां बरें पालट होतो ? माझीच गोष्ट घेना ! मी लहान असतांना माझ्या मनाची स्थिति कोणती होतीं—पुढें गेल्या सात आठ वर्षांत त्या स्थितींत पालट किती झाला—आणि तेंच मन आज कोणत्या स्थितींत आहे—केवढा फरक तुला सांगूं !

बे०—( मनांत ) नशीबा ! तुला माझी दया तर आली नाहीं ना ? हें आज मी काय ऐकते ! हें मला आज कांहीं निराळेच वाटताहेत. खचीत यांच्या वृत्तींत कांहींतरी पालट झाला त्यांत संशय नाहीं ! देवा ! माझा तर्क खरा होऊं दे. ( उघड ) आज हें तुम्हीं काय मांडलं आहे ? मन काय—फरक काय—आहे तरी काय ? सांगा तरी एकदाचं.

शा०—( तिला जवळ घेऊन ) अग तुला काय सांगूं ? तुझ्या हातांतून गेलेला शामराव तुला परत मिळाला याबद्दल तूं इश्वराचे आभार मान. अरेरे आज मला अशी कांहीं जबरदस्त ठेंच लागली कीं त्या ठेचेच्या तिरमिरींनें आजपर्यंत माझ्या डोळ्यावर आलेला पडदा झट्दिशीं उडून माझे डोळे साफ उघडले—साफ—( तिच्या तोंडावर हात फिरवून ) हर ! हर ! या तुझ्यासारख्या सद्गुणी स्त्रीचा अव्हेर करून मी त्या कृतघ्न, आपमतलबी व वरवरून प्रेम दाखवून केसाने गळा कापणाऱ्या कुलटेच्या नादीं लागलों—अरे ! अरे ! तुला आजपर्यंत मी कितीतरी त्रास दिला. ( गहिंवरून ) मी अधम—अगदीं अधम—

बे०—अह्हो पण असं झालं तरी काय ?

शा०—आतां तुला सांगायला हरकत नाहीं. ती रंगी—अग त्या धगडीनें माझी शोभा करून मला घरांतून हांकून किंग लावलं ! अग नुसतं हांकून लावलं असतं तरी चिंता नव्हती, पण मला तिनें सपातानें—

बे०—( रागानें ) काय ह्मणतां ? त्या अवदसेनें तुह्मांला सपातानें मारलं ? ( बोटें मोडून ) मेलीचे हात नाहीं जळून खाक झाले या सोन्यासारख्या शरीरास सपातानें मारतांना. पाहूं पाहूं–कोठें मारलें तें. लागलं बिगलं नाहीं ना ? सांगा, मी तेल चोळते—

शा०—अहाहा ! अशी कळकळ व काळजी यांची बाहेरच्या स्त्रियांकडून स्वप्नांत देखील आशा करणें व्यर्थ ! ( उठून ) नको–मी तुझ्या प्रीतीस बिलकूल पात्र नाहीं. या माझ्या पापी देहास हात लावून तूं आपला पवित्र हात विटाळूं नकोस. मी जातों–जातों–माझं एकदाचं काळं करतों—

बे०—असं वेड्यासारखं काय करतां ? बसा—

शा०—नाहीं–नाहीं–मी तुझ्या शेजारीं बसण्यास योग्य नाहीं—आहा ! कितीतरी हें तुझं थोर मन ! अग तुला केलेल्या अपकाराबद्दल तूं मला उपकारानें मारीत आहेस ! अरेरे ! असा हिरा कीं ज्याच्या प्रकाशानें मला शोभा आली असती त्याचा त्याग करून त्या गारगोटीचा स्वीकार केला व आपणास काळिमा लावून घेतला ! किती मी दुर्दैवी !

बे०—पुरे ! पुरे ! इतकं कांहीं मला शिखरावर नेऊन ठेवायला नको !

## पद

**पतिहुनि न आम्हा देव दुजा। आळवितां मजला पावला ॥ धृ० ॥**
**उदास ना अजि । अज्ञ बालीका । तोषविलें या मानसा ॥ १ ॥**

आहे मी आपली कशीतरी–संभाळून घ्या म्हणजे झालं—

शा०—बरं पण, आज दिवसपर्यंत तुझा जो मीं छळ केला त्याची पहिल्यानें तूं मला मनापासून क्षमा करशीलना ?

बे०—छेः छे ! हें काय असं बोलतां ? मीच उलट आपणांस कधीं कधीं टाकून बोललें असेन त्याची आपणांजवळ माफी मागतें—

शा०—आहाहा ! हिरा तो हिराच ! ( तिला आलिंगन देतो. )

बे०—( शामरावाचा हात धरून ) मग झाला ना अगदीं निश्चय तुमचा ? आजपासून सर्व व्यसनें सोडायचींना ?

**शा०**—ह्मणजे यांत काय संशय ! झाला माझा निश्चय. मला माझ्या पूर्व कर्मांचा पूर्ण पश्चात्ताप झाला आहे. नको आतां ते छंद. मला त्यांचा अगदीं वीट आला. ( इतक्यांत बाहेरून कोणी दार ठोकतें )

**बे०**—दरवाजा कोण बरं ठोकीत आहे ? या रात्रीच्या वेळीं कोण बरं आलं असावं ?

**शा०**—कोण आलं असावं बरं ? छेः बुवा कांहीं समजत नाहीं. ( बाहेरून–'दरवाजा उघडा' असे शब्द येतात. )

**बे०**—( घाबरून ) हें काय बरं आहे ? माझा उजवा डोळा कां बरं लवतो ? खरोखर मला हें बरं चिन्ह दिसत नाहीं.

**शा०**—अग भिऊं नकोस. मी आतां दरवाजा उघडतों ह्मणजे काय आहे तें सर्व समजेल.

( बाहेरून–'दरवाजा उघडतां कीं फोडून आंत येऊं' असे शब्द येतात. व दरवाजावर बाहेरून कोणी लाथा मारतात. )

**बे०**—( घाबरून ) अगबाई–हें काय ? हे आहेत तरी कोण ? घरांत दुसरं कोणीच्च नाहीं का ? दादाजी व दादी कोठें गेली ?

**शा०**—अग हा पहा दादाजींचा शब्दही त्यांच्यांत ऐकूं येत आहे. अग थांब, तूं येथेंच्च ऐस. मी दरवाजा उघडतों व काय आहे तें पहातों.

**बे०**—नको–नको–मला वाटतं हे कोणी पोलिसचे शिपाई असावेत. पण त्यांचं येथें काय काम आहे ? सांगा–माझ्या गळ्याची शपथ आहे तुह्मांला. तुह्मीं असं कांहीं वेडंवांकडं केलं नाहींना ?

**शा०**—तुझ्या गळ्याची शपथ तसं कांहीं मी केलं नाहीं.

**बे०**—तर मग हे लोक येथें आले कशाला ? खरोखर मला बाई भीति वाटते.

**शा०**—हें पहा. मीं जरी कांहीं केलं नाहीं तरी मला वाटतं कीं त्यांचा हेतु मला धरण्याचा दिसतो. नाहींतर दरवाजा फोडण्याची भीति त्यांनीं घातली नसती. पण निःसंशय यांत कांहीं तरी चूक झाली असावी ! ( बाहेरून–'दरवाजा एकदम खोलो' असे शब्द येतात. बाहेरून लाथा मारतात. शामराव दरवाजा उघडण्यास जातो. )

**वे०**—( त्यास अडवून ) पण तुह्मी नको दरवाजा उघडूं. मी उघडतें–तुह्मी लपून रहा येथें कोठें तरी. तुह्मीं येथें नाहीं म्हणून मीं त्यांना सांगतें.

**शा०**—छेः छेः वेडी कोठची ! अग, असं केल्यानें नसता गुन्हा माझ्या पदरीं पडणार ! हें पहा त्यांनीं दरवाजा फोडण्याचा प्रयत्न चालविला आहे. जाऊं दे मला ! आतां एक क्षणभरही विलंब करितां उपयोगी नाहीं. उघडतोंच मी दरवाजा–तूं तेथें जाऊन बैस. ( शामराव दरवाजा उघडतो. ) काय गोंधळ मांडला आहे तुह्मीं हा ? काय तुमचं येथें काम आहे ? ( आंत दोन शिपाई व एक कान्स्टेबल शिरतात. )

**शा०**—तुह्मांला काय पाहिजे ?

**कान्स०**—( हातांतील कागद वाचून ) इज् युअर् नेम् शामराव खंडेराव ?

**शा०**—यस्, धाट्स माय् नेम्.

**कान्स०**—वेल्. हियर् आय् ह्याव ए वॉरंट् ऑफ् ॲरेस्ट अगेन्स्ट् यू.

**शा०**—( आश्चर्यानें ) वॉरंट अगेन्स्ट् मी ? व्हॉट् फॉर् ?

**कान्स०**—रीड् इट फॉर् युअरसेल्फ. ( वॉरंट शामरावाच्या हातीं देतो. )

**शा०**—( वाचून ) ऑल् धिस् इज् ए गॉट् अप् अफेअर ! हा सर्व बनावट खटला आहे. मी रात्री रंगीच्या घरीं होतों खरा. पण तेथून निघाल्यावर तिच्या येथें मीं पुन्हां कसा तो पाय ठेवलाच नाहीं.

**शि०**—रावसाहेब या वेळीं आपण कांहींही न बोलाल तर ठीक ! जें कांहीं बोलावयाचें असेल तें बोलण्यास पुढें तुह्मांला पुष्कळ सवड मिळेल.

**कान्स०**—वेल् कम् ऑन्, मेक् हेस्ट् प्लीज्—

**शा०**—यस्, आय् उइल् जस्ट् बी रेडी ( कपडे घालीत असतां—)

**खं०**—( आंत येऊन ) आय् से मिस्टर् कानिसटेबल् , व्हाय् यू मेक् न्यूसन्स हियर् ?

**कान्स०**—( हंसून ) वेल् ओल्ड् जन्ट्लमन्, आय् ॲम् व्हेरी सॉरी टु से धाट् आय् ह्याव् ए वॉरंट् अगेन्स्ट् धिस यंग् म्यान्.

**शा०**—दादाजी–तुम्ही अगदी भिऊं नका ! हा खोटा चार्ज माझ्यावर अदावतीनें घातला आहे. मी जातो यांच्या बरोबर. परंतु तुह्मी स्वस्थ असा !

**खं०**—आय् से, माय् सन् मेक् नो फ्रॉड् ! व्हाय् यू टेक् हिम् ?

**कान्स०**—वेल उइ मस्ट् डिसचार्ज अवर् ड्युटी ! कम् ऑन् माय यंग् म्यान्.

**खं०**—व्हेरी वेल--डोंट् थिंक् मी लेस ! आय् मेक इनव्हेरीटी ब्यॅरिस्टर-हं.

( बाहेर जातो. )

**शा०**—( बेनाबाईची समजूत करून ) कम् ऑन्—आय् ॲम् रेडी.

( शामराव पोलिसच्या लोकांबरोबर जातो, बेनाबाई शोकाकुल होऊन बेशुद्ध होऊन पडते. )

---

## प्रवेश ४ था

[ **स्थळ**—रस्ता. ]

( **रामराव** व **गजानन** )

**रा०**—हॅलो ! कोण गजानन ? फार चांगलं झालं. मी तुझ्याचकडे येत होतो. तूं कोठें निघालास ?

**ग०**—जायचं आहे जरा कामाला. कां बरं ? एवढ्या सकाळीं घरीं कशाला चालला होतास ?

**रा०**—तूं कांहीं ऐकलं नाहींस ?

**ग०**—नाहीं बाबा. काय ?

**रा०**—आज सकाळीं आमचें घरीं तो विनायकराव आला होता त्यानं असं कांहीं सांगितलं कीं आपल्या शामरावाला रात्रीं पोलिसांनीं पकडून नेलं म्हणून !

**ग०**—व्हॉट ? शामरावाला पकडून नेलं ? व्हाय ?

**रा०**—कारण काय तें बुवा बरोबर समजलं नाहीं व म्हणूनच तुझ्याकडे येत होतों चौकशी करायला.

**ग०**—खरोखर मला मोठं नवल वाटतं या गोष्टीचं ! मग काय, येतां त्याचे घरीं ? दादाजींनां विचारूं—

**रा०**—वाः ! शहाणाच आहेस तूं तरी ! अरे दादाजी आधींच जिवंत आग; त्याच्यांत शामरावाला खरोखरच पकडून नेला असेल तर मग आगीवर तेल पडल्यासारखं झालं असेल. छेः ! त्यांचेजवळ कोण जाऊन विचारील ! अरे तो पिसाळलेल्या कुत्र्यासारखा आंगावर येईल धांवून. तशांत तो बाहेरून जरी दाखवीत नाहीं तरी आपल्यावर आंतून खुब जळत असेल.

**ग०**—अं ! आय् डोंट केअर् फॉर सच् ओल्ड् फूल्स ! पण तूं म्हणतोस तेंही खरं. अशा वेळेला त्यांच्याजवळ जाऊं नये हेंच बरें ! अरे पण बरी आठवण झाली. त्या दुङ्काचार्याकडे जाऊं चल. त्याला माहित असेल.

**रा०**—यस ! कम् ऑन्.

**ग०**—पण पहिल्यानें मला कामाला जायचं आहे तिकडे जाऊं. तिकडून मग जाऊं त्याचेकडे—चल तूंही बरोबर ये. ( इतक्यांत खंडेराव येतो. त्यास पाहून ) अरे तो रे कोण समोरून येतोय ? दादाजी तर नाहीं ? बघ–बघ—

**रा०**—(पाहून) अरे दादाजी रे दादाजी. टॉक ऑफ् दी डेव्हील अँड देअर ही इज् ! चल–चल. त्याचे नजरेस पडतां कामा नये. ( बाजूस जाऊं लागतो. )

**ग०**—( त्यास अडवून ) अरे तिकडे कोठें चाललास ? भितोस कशाला इतका त्याला ! आपल्याला खाउन तर टाकीत नाहीं ! चल, आणि हें पहा, त्याच्याच कडून आपण ही बातमी काढूं.

**रा०**—नकोरे. बिचारा दुःखांत असेल. त्याच्याशी वात्रटपणा करून दुःखावर डाग देणें बरोबर नाहीं.

**ग०**—व्हॉट्, यू पिटी हिम् ? नो–नो–ही डिझर्व्ह्ज् इट्–रिचली डिझर्व्ह्ज् इट ! मी पहा युक्तीनें त्याचे जवळून कशी बातमी काढतों ती. तो पहा आला. ( खं० येतो. )

**ग०**—दादाजी, शामराव घरीं आहे का ?

**खं०**—( न्हाहाळून ) कोण ? गजानन ? का कशाला पायजे शामराव तुला ?

**ग०**—नाहीं विशेष कांहीं नाहीं.

**खं०**—नाय कसं. जावाच असेल रात्री कोठें भटकाला; नायते टिपीण बिपीण अशेल !

**ग०**—नाहीं हो दादाजी टिफीण कशाची—

**खं०**—टिपीण कशाची ? शरम नाय वाटे ? गाढवांदो, तुमीच त्या शाम्याला बिघडून टाकलात. तो तुमचे कंपनीन जावाला लागल्यापासून अगदीं बिघडून गेला. नायते पोर कसा शाणा होता.

**रा०**—असं काय ह्मणतां दादाजी ! आम्हीं त्याला बिघडविला ?

**खं०**—तुमी नायते कोणी ? करून सवरुन साव ? विचाराला शरम नाय वाटे !

**रा०**—पण असे तुह्मी रागावतां कां दादाजी ? आमचा त्यांच्यांत काय वरं वांक ? आह्मीं होऊन त्याला बोलावलं का आमच्या कंपनींत ? आणि आमचे कंपनींत आला नसता तरी तो खराब झाला नसता का ?

**खं०**—अलबत नसता ! माजे पोराला तुमीच खराब केलात.

**ग०**—बरं पण दादाजी. शामरावाला आह्मी खराब केला. आणि वामनरावाला न धाकलाभाईला कोणीं खराब केलं ? ते तर आमचे कंपनींत नव्हते—अहो, बीज तसं—

**खं०**—का बोललास ? बोल—पुन्हां बोल—

**ग०**—हो हो ! खरं बोलायला काय हरकत आहे ?

**रा०**—( गजाननास ) तूं बसरे गुपचिप. ( खंडेरावास ) कांहीं नाहीं हो दादाजी. तो मूर्ख आहे, त्याचं काय ऐकतां !

**खं०**—चालते व्हा पोरांदो, सगळे तुमी सारखेच ! भाड नाय भीड नाय ! उनाड कोठचे ! भोगाल पोरांदो भोगाल ! तुमचे हाल कुत्रा नाय खाणार ! जा इकडशी. ( काठी उगारतो रामराव व गजानन निघून जातात. )

**खं०**—या पोरांनीं माजे शामाला खराब केला. खरोखर माजे स्वप्नान पण नवत का माजे पोरांचा मला अवडा त्रास होयल म्हणूण. मी माजे स्वताला मोठा भाग्यवान समजत होतूं. पण मला अगदीं उलटा अनभव आला. मोठा बायला झाला, शाम्याचं हें असं झालं न धाकलाभायचा ते अजून पत्ता नाय ! या ह्मातारपणी का हे हाल न अपेष्टा ! देवा ! मीं तुजा का असा अपराध केलता कीं माजे तीन मोठाले सोकरे असून त्यांतून एक पण कामासारखा नाय ! या पोरांचे जोरावर मीं कोणाची पण बिलकूल परवा केली नाय ! त्यांचे लगनाचे वेळीं लोकांना कसं कसं अडवून धरलं हुंड्यामदी नेमाचेपेक्षां एक वाल पण कमी नाय केला ! पण ज्यांचे जोरावर मीं अवडा डौल मारला त्यांनीं कसा मला दगा दिला ! माजं घर अगोदर कसं गजगजीत दिसत होतं ! एक धाकटसं राज होतं—राज ! अन मी राजा होतूं ! पण आतं का हाय ? ओसाड न शून्य घर दिसते ! तिघं पोरांमदशीं एक पण पोर घरान नाय ! ( गहिंवरून ) माला एकटे ह्मातान्याला ठेवलय ! देवा ! असं होवाच होतं ते माला कशाला जिवंत ठेवलस या ह्मातारपणीं अन हीं अपेष्टा पावाला मी राहिलुं तरी कशाला ! खचीत देवाचा माज्यावर कोप झालय यान संशय नाय ! अन अवडा कोप होवाच

कारण पण मीचं ! आतं माझे ध्यानांन आलं ! त्या लोकांचे तळतळाट ते नडले नाय ? कसे नाय नडणार ? मी का कोणाचं आज दिवसपर्यंत चांगलं केलंय ? उलटा झाला तवडा त्रास दिला. कोणाला दया नाय दाखवली ! माया नाय दाखवली ! तिचं ऐकलं नाय ! सोबत्यांचं ऐकलं नाय ! कोणाचं ऐकलं नाय ! मी माझा हेका धरून बसलं–अन माला घेवाचं ते मापून–मोजून–चोपून घेतलं ! सगळे वेवलुकांना कस पिळून पिळून घेतलं. सुंदररावाला उटवला का नाय दुनियेमदशीं ! त्या काशीबायचे हाल अगदी बगवत नाय नजरेशी ! अन्नाला मोताद झालय विचारी ! या सगळ्याच कारण मीच नाय का ? अन अवड घेऊन ते पाटीमगारी तरी रायलं ? श्याम्यान ते होतं नवतं ते वाटेला लावल. धाकल्यान ते घरानच–लोकांचं–सगळं पार केलं ! झालं आतां धुपाटणं हातीं रायलय ! बरोबर हाय, आलं तसं गेलं ! हा देवाचें घरचा न्यायच झाला ! जुलमाशीं घेतलेल्या पैशाला न सोन्याला बरकत ती कशी असेल ? असो. आतं झाले गोष्टीचा उगीच शोक करून का उपयोग ! होवाच ते चुकते ? आपले नशीबानच हाल लिवले असतील ते सुख कोटच मिळणार ? चला. शामाला रात्रीं पकडून नेलय त्याचेबद्दल विचाराला जातंय विश्वासरावाचेकडे. हाय त्याला माझी कळकळ. तो पण बिचारा शामासाठी हळहळते हो ! पण त्याचे हातान का हाय ? बगाला गेलं ते तो न शामा एक वयाचे, पण त्याचे गुण न त्याची अक्कल न त्याचा शाणपणा कोटें ? पोर असावा तो असा असावा, नायते सगळींच पोरं. पोरं तरी चांगलीं निघाला तसंच पुण्य पदरीं पायजे ! चला.— (जातो)

---

## प्रवेश ५ वा

[ **स्थळ**—विश्वासरावाची खोली. ]

( विश्वासराव )

**वि०**—काय चमत्कार आहे तरी हा ! रात्रीं शामरावाची भेट झाल्यापासून पुन्हा पुन्हा तीच गोष्ट मनांत येते ! कोणतीही गोष्ट बरी व्हावयाची असली म्हणजे एकादें क्षुल्लक कारणही पुरें होतें. या शामरावाला सुधारण्यासाठीं, आज सतत दोन वर्षे झालीं, मीं अनेक खटपटी केल्या. हा नाहीं तर तो–तो नाहीं तर

हा—असे नानाप्रकारचे उपाय केले. पण छेः! सुधारण्याची तर गोष्ट एकीकडे-सच राहिली. उलट जास्त बहकत चालला होता. शेवटीं निरुपायानें हात टेकून स्वस्थ बसावें लागलें. पण काय चमत्कार आहे पहा! जें काम एवढी खटाटोप करूनही साध्य झालें नाहीं तेंच एका क्षुल्लक गोष्टीनें कसें हं हं म्हणतां साधून गेलें! वेश्याजनास योग्य अशा रीतीस अनुसरून रंगी त्याला हांकून लावते व त्यामुळं शामरावास सर्व व्यसनांचा वीट येतो काय! व तो तसाच मजजवळ येऊन आपलें वर्तन सुधारण्याबद्दल अंतःकरणपूर्वक आणा शपथा वाहतो काय! हें आहे तरी काय? रात्रीं तो मजकडे येऊन मला जेव्हां आपल्या वृत्तींत पालट झाल्याचें सांगूं लागला तेव्हां पहिल्यानें मला तें खरेंच वाटेना व त्याप्रमाणें मीं त्याला सांगितलेंही. परंतु पुढें त्याविषयीं त्यानें माझी खात्री केली. तरी पण, तो घरीं गेल्यावर, झालेला प्रकार मीं स्वप्नांत पाहिला कीं खरोखर पाहिला याविषयीं माझ्याच मनांत संशय उत्पन्न होऊं लागला! बरोबरच आहे! असा प्रकार घडून येणें ह्मणजे एक दैविक चमत्कारच म्हणायचा!

## पद

**दैववाद वितरत हा। मोहवी जगा ॥ ध्रु० ॥**
**तोडि बंधनांना। बोध हा रुचेना।**
**थोरवि जरी नीतिवादा। मान्य ना तयाला ॥ १ ॥**

पण तें कांहींही असो. शामरावाची वृत्ति पालटली यांत बिलकूल संशय राहिला नाहीं! आतां मात्र त्याला कांहीं वेळ संभाळला पाहिजे! हो! नेम काय सांगावा! सपातानें खाल्लेला मार झणझणत आहे तोंपर्यंत एकादे वेळीं ही वृत्ति टिकायची! नाहीं तर येरे माझ्या मागल्या! पुन्हां मित्रमंडळीच्या व तशांत त्याला त्या दोन जबरदस्त लागलेल्या जळवा रामराव व गजानन यांच्या तडाक्यांत सांपडला कीं वृत्ति बदलायला वेळ लागायचा नाहीं! त्याला त्याच्या मित्रमंडळीपासून कांहीं दिवस दूर ठेविला पाहिजे! याला उपाय काय बरं करावा? (विचार करून) वा! नामी उपाय! माझी प्रकृति अंमळ अस्वस्थ असल्यामुळें डाक्टरनें मला पुण्यास जाण्यास सांगितलें आहे. पुढल्या महिन्यांत तेथें जाण्याचा माझा विचार होता. परंतु एक दोन दिवसांतच निघण्याचा बेत करावा—व शामरावास बरोबर घेऊन जावें. त्यामुळें त्याचे सोबतीही दूर ह्मातील व तोही नेहमीं माझ्या नजरे-

समोर असेल. असे महिना पंधरा दिवस गेले ह्मणजे मग हरकत नाहीं. हाच बेत उत्तम. चला-त्याच्या घरीं जाऊन दादाजींना सर्व सांगून त्यांचा हुकूम घेतों. शामराव तर नाहीं म्हणावयाचा नाहींच ( खंडेराव येतो. ) कोण दादाजी ? तुह्मी कां बरं इकडे ?

**खं०**—( गहिंवरून ) विश्वासराव आता तुजेजवळ येव नाय ते कोणाजवळ येव ? माज दुख सुख सगळ सांगाच ते एक देवाजवळ न दुसर तुजेजवळ—

**वि०**—भिऊं नका दादाजी. आतां तुमचे दुःखाचे दिवस सरत आले आहेत असं समजा.

**खं०**—हो खरंच. एकदाचे माजे डोळे मिटले ह्मणजे मग मला सुख का न दुख का ! सगळ सारख.

**वि०**—असं काय दादाजी बोलतां तुह्मी ? आज तुह्मी असे उदास कां दिसतां बरं ?

**खं०**—विश्वासराव का सांगू तुला-( डोळ्यांत आंसवें आणून व गहिंवरून ) माजे शामाला—

**वि०**—काय-शामरावाला काय झालं ?

**खं०**—( गहिंवरून ) पकडून नेल—

**वि०**—शामरावाला पकडून नेलं ? कोणीं ?

**खं०**—पोलिसचे लोकांनीं.

**वि०**—कां ?

**खं०**—( खिशांतून पत्र काढून ) हे बग त्याचच पत्र हाय. वाच. त्यान लिवलय सगळ. पत्र आलं मारब्रावर्डीचे चौकीवरून. मला ते त्यान काय समजे नाय !

**वि०**—( पत्र वाचून ) अंः भिऊं नका तुह्मी. त्यांत कांहीं नाहीं ! आणि हें झालें तें एका अर्थी बरेंच झालें !

**खं०**—तूं तरी अस विश्वासराव का बोलतेस ? माझा शामा जरी अगदी वाईट असला तरी तो तुरंगान गेलेला माज्यान बघवेल का ? किती झाला तरी तो माजा पोरच न ?

**वि०**—तसं नाहीं दादाजी-मी त्या अर्थानें बोललों नाहीं. हें पहा शामरावाला पकडल कशासाठीं तें ठाऊक आहे का ?

**खं०**—नाय बाबा—मला का पण खबर नाय. पण काल पकडून नेल तंव रंगीच का कोणाचं नांव निघाल होत खरं.

**वि०**—तेंच ते–हें पहा शामराव रात्रीं ९ वाजण्याच्या सुमारास रंगीच्या येथें गेला होता. तिकडे त्याचें तिच्याबरोबर मोठें भांडण झालें व तिनें त्याला फट्-फजिती करून घरांतून हांकून लावलें. पुढें मग सुमारें ११ वाजतां ती निजली असतां तिच्या नाकावर कोणीं मोठी जखम केली. ही जखम शामरावानेंच केली असं तिचं म्हणणं आहे. व ह्मणून त्याला संशयावरून पकडलें आहे. (स्वतांशीं) चार्ज तर सिरियस् आहे. परंतु ही मला अगदीं फिझिकल् इम्पॉसिबिलिटी दिसते ! रंगीचे येथून सुमारें १० वाजतां शामराव येथें आला तो १२ वाजेपर्यंत माझ्याजवळच होता. मीच त्याला १२॥ च्या सुमारास घरीं पोहोंचता केला. छेः हें काम शामरावाच्या हातून झालेलें नाहीं. कोणी एकाद्या लफंग्यानें केलं असावं. आणि शामरावही पत्रांत लिहितो कीं तिचा भाऊ रात्रीं एकाएकीं घरांतून पळून गेलेला आहे. व त्या रात्रीं शामराव रंगीच्या येथें गेला त्यापूर्वी रंगीचा व तिच्या भावाचा अगदीं निकराचा तंटा झाला होता असेंही शामराव लिहितो ! तेव्हां बहुतकरून त्याचंच हें काम असावं !–(उघड) दादाजी यांत कांहीं अर्थ नाहीं–शामराव सुटलाच पाहिजे.

**खं०**—का सांगतेस, माझा शामा सुटेल ? हं ?

**वि०**—हो हो, यांत काय संशय !

**खं०**—तुजेजवळ असा का पुरावा हाय ? सांग–सांग–बाबा–सांग—

**वि०**—धीर धरा. मी आतांच तुमच्या बरोबर येतों.–आपण दोघेही शामरावाला जाऊन भेटूं– मी जातां जातां तुह्मांला माझे विचार सांगतों. मला तुह्मांला पुष्कळ सांगायचं आहे. ( कपडे घालून ) चला—

**खं०**—चल बाबा— ( जातात )

( रस्त्यावर )

**वि०**—समजलेत आतां ? आतां तर तुमची खात्री झाली ! जरी तिचा भाऊ मिळाला नाहीं तरी माझ्या एकट्याच्या साक्षीवरून शामराव सुटला पाहिजे.

**खं०**—मी का सांगूं बाबा.– तूं सांगतेस ते सगळ बरोबर हाय. पण बाबा पोलिसशी काम हाय–त्यांचे कचाट्यांतून माजा शामा सुटेल तवं माझे जिवान जीव येल.

**वि०**—दादाजी एवढं लक्षांत ठेवा कीं ह्या वेळेस जर शामरावाला सोडवून तुह्मांस तो मिळवून देईन तरच माझं नांव विश्वासराव !

**पद**

**त्राता अतां प्रभु एकला । संकटासी नेई लया ॥ ध्रु० ॥**
**ना ठाव विपदा संसृतीं । आधार दैवहि जरि देतां ॥ १ ॥**

( जातात )

---

## प्रवेश ६ वा.

( **स्थळ**—डुकरगल्लींतील घर.)

**[ वामनरावाची खोली. ]**

( वामनराव व पुतळाबाई. )

**वा०**—( हंसत ) पुरली तुझी हौस निराळा संसार मांडण्याची ?

**पु०**—एकदां सांगितलं ना ? आणखी पुन्हा तेंच न तेंच काय !

**वा०**—बरोबरच आहे ! तुला काय त्याचं ! ज्याला करावं लागतं त्याला समजतं. हा निराळा संसार मांडल्यापासून मला तर वाटत नाहीं कीं आपणांस एकादा ढळढळीत नफा झाला. उलट एकाचा दुप्पट खर्च चालला आहे. शिवाय, आपण एकत्र होतों तेव्हां मला जें सुख होतं त्याच्या निम्मेदेखील आतां राहिलें नाहीं. याखेरीज, दादाजींची व दादीची मर्जी उडाली ही निराळीच गोष्ट. खरोखर, मला आतां तर असं वाटूं लागलं आहे कीं त्या वेळेस तुझ्या ह्मणण्याकडे दुर्लक्ष्य केलं असतं तर फार चांगलं झालं असतं. तुझ्या पोरकट विचाराकडे त्यावेळीं मी लक्ष्य दिलं याचं आतां मला फार वाईट वाटत आहे.

**पु०**—( रागानें ) तुह्मी पुरुष असेच आरंभीं शूर ! नवीन नवीन तुह्मीचना ह्मणत होतां कीं निराळे झाल्यापासून आपण पुष्कळ स्वतंत्र झालों ?

**वा०**—पण ही स्वतंत्रता काय कामाची ! मी एकत्रांत रहात होतों तेव्हां कमी स्वतंत्र होतों असं नाहीं. तूं मात्र खरोखरीच स्वतंत्र झालीस. तुला आतां कोणाचा दाब नाहीं, कांहीं नाहीं. हवं तसं वर्तावं ! आतां तूं खरी स्वतांची मालकीण झालीस ! छेः, पण मला हें ठीक दिसत नाहीं. हा अनुभव पुष्कळ

झाला ! मला वाटतं, दादाजीजवळ जाऊन त्यांची माफी मागावी व पूर्वीप्रमाणें त्यांजपाशीं जाऊन रहावं !

**पु०**—(रागानें) माझं अडलं आहे इथं त्यांची माफी मागायला ! तुह्मींच मागा पाहिजे असल्यास. मला तर त्यांच्या पायरीवर कसा तो पाय ठेवायचा नाहीं.

**वा०**—हा स्वतंत्रतेचा परिणाम ! बाळमित्रांतील "मुलें जीं स्वतंत्र व्हावयास पहातात," त्यांच्या गोष्टीसारखी आपली गोष्ट होणार. आज निराळे होऊन चार महिने झाले नाहींत तों आपल्या लहानशा संसाराचे हे हालहवाल !

**पु०**—अहो पण संसाराचे हालहवाल ते काय झाले हें तर कळूंद्या !

**वा०**—नाहीं कसे ? आतां पहा. तुझें माहेर शेजारींच असल्यामुळें उठबस चाललीस तिकडे ! घरांत तेवढा स्वयंपाक करण्यापुरती. जेव्हां पहावी तेव्हां तिकडे. मग मागें घरांत कोण येतं कोण जातं याची काळजी तरी !

**पु०**—कां घरांत गडी नसतो का ?

**वा०**—वाहवा ! गड्याच्या हवालीं घर दररोज ठेवल्यानें, जरी तो विश्वासू असला तरी त्याची बुद्धि फिरण्याचा संभव नाहीं काय ?

**पु०**—(रागानें) तुमचें तो काय घेऊन गेला ?

**वा०**—इकडे हिशेब कोणीं ठेविला आहे ? पण मला तर असं वाटतं कीं त्याच्या हवालीं सर्व घर टेवणें हें अगदीं अप्रशस्त आहे. आणि अलीकडे मी पहातों कीं आपल्या लहानसहान जिनसा जिकडच्या तिकडे नाहींशा होतात. तें कशाला, पंधरा दिवसांपूर्वींच अर्धा फरा तांदुळ आणले—आणि कालच तूं म्हणालीस कीं दोन तीन दिवस आणखी तांदुळ पुरतील. तर काय पंधरा वीस दिवसांत आपणां दोघांस अर्धा फरा तांदुळ लागले ? मला वाटतं कीं तुझा या संबंधानें चांगला बंदोबस्त नसल्यामुळें आपला पुष्कळ तोटा होत आहे. तुझं चित्तच जर घरांत नाहीं तर हा संसार नीट चालणार तो कसा ? छेः हें असं आपणांला बुवा पतकरत नाहीं. असली ही मला स्वतंत्रता नको. पुन्हा, माझ्या जेवणाखाण्याची देखील नीट व्यवस्था तुझ्यानें ठेववत नाहीं.

**पु०**—झालं आपलं, कांहीं तरी बोलायचं ह्मणून बोललेत ! कां, केव्हां तुह्मांला उपाशीं ठेवलं होतं ?

**वा०**—उपाशीं ठेवायला कशाला पाहिजे ? पण कधीं तरी जेवण वेळेवर मिळालं असं झालं आहे का ? बरोबरच आहे, मुळीं पांच वाजतां माहेरून परत येणार, त्यानंतर सर्व करायचं ! मग जेवण तें वेळेवर कसं तयार होणार ?

**पु०**—येऊन जाऊन तुमचा डोळा सगळा माझ्या माहेरीं जाण्यावरच ना ? बरं तर; मी उद्यांपासून माहेरीं जाणार नाहीं; मग तर झालं ना ?

**वा०**—जाईनास तूं खुशाल बापडी. मी नको कशाला ह्मणूं ? पण तेवढं केल्यानें आपला संसार सुरळीत चालेल असं मला वाटत नाहीं. नको, मी उद्यां दादाजींकडे जाऊन त्यांची समजूत करतों !

**पु०**—( रागानें ) तुह्मांला वाटेल तें करा ! पण मी साफ सांगतें हो कीं मी आतां तुमच्या आईच्या हाताखालीं नांदणार नाहीं ! हो. आतां त्यांच्यांत जाऊन रहा आणि मग ते आपणास वेळोवेळीं पदोपदीं टोमणे देणार ! मला नाहीं बाई असं सहन व्हावयाचं ! तुमचे आईबाप तुह्मांस गोड ! मला नाहीं !

**वा०**—हें तुझ्या डोक्यांतील वेड लवकरच निघेल. हे पहा, या गोष्टीचा तूं नीट विचार कर ह्मणजे तुझेंच तुला वाटेल कीं मी ह्मणतों हेंच खरं.

**पु०**—विचार तो आणखी काय करायचा ? माझा विचार एकदां सांगितला तोच !

**वा०**—वेडी कोठची ! ( पांडु गडी येतो. )

**पांडु०**—दादीबाई, तुह्मांसनी आईनीं बोलावलंय. जरा येऊनशी जा असं सांगितलंय.

**पु०**—बरं मी आतां येतें.

**पांडु**—मी जाऊं का तुमी माझ्यासंग येता ?

**पु०**—थांब, मी तुझ्याबरोबरच येतें. ( आंतून शाल घेऊन येते.)

**वा०**—घ्या. रविवारींदेखील तेथें गेल्याशिवाय चैन पडत नाहीं !

**पु०**—मी होऊन चाललें कीं आईनें मला बोलवायला पाठविलें ?

**वा०**—( हंसून ) एकुण एकच !

**पु०**—बरं, मी जरा जाऊन येतें. तुह्मीं घरांतच आहां ना ?

**वा०**—खुशाल आपली जा. तुला नाहीं कोण ह्मणेल ? मी घर सांभाळायला आहेच ! ( पुतळाबाई गड्याबरोबर जाते. )

**वा०**—छेः ! थोड्या वेळांत हिचं घरांतून चित्त उडून गेलं, तर पुढें हीची काय अवस्था होईल ? पुरे आतां ही स्वतंत्रता ! हिला ताळ्यावर आणण्यास दुसरा उपायच राहिला नाहीं ! पुन्हां कुटुंबांत जाऊन राहिलं पाहिजे ! उद्यां सकाळीं पहिलं काम हें. दादाजींना जाऊन भेटतों व त्यांची समजून करतों. दादाजी नाहीं ह्मणणार नाहीं. आतां, तिथें पुन्हां जाऊन राहणं हिला रुचणार नाहीं खरें, परंतु त्याची परवा न बाळगतां मला योग्य वाटतं तेंच केलं पाहिजे. बायकांच्या ओंजळींत पाणीं पिणाऱ्या नवऱ्यांस या माझ्या अनुभवापासून पुष्कळ उपदेश घेण्यासारखा आहे. मला खोटें खोटें सांगून आईबापाविषयीं माझं मन दूषित केलं व आपला हेतु पार पाडला ! हिच्या ह्मणण्यावर भरंवसा ठेवून व नीट विचार न करितां, मी आईबापांपासून एकदम वेगळा झालों. आपल्या आईबापांची त्यांच्या वृद्धापकाळीं माझ्यासारख्या मुलानें काळजी घेऊं नये तर मग कोणी घ्यावी ? पण, मी हा पुत्रधर्म एकीकडे गुंडाळून ठेवून माझ्या अविचारी बायकोच्या ह्मणण्याप्रमाणें चालण्यास प्रवृत्त झालों. असो ! झाल्या गोष्टीस उपाय नाहीं ! मला चांगलीच टेंच लागली ! व हिनें मला बराच शहाणा केला !

( पडदा पडतो. )

---

## प्रवेश ७ वा.

( **स्थळ**—अपोलो बंदर. )

( धाकलाभाई विलायतेच्या आगबोटीवरून नुकताच उतरला आहे. )

**धा०**—( स्वगत ) अद्याप विश्वासराव कां बरें आला नाहीं ! मीं बॅरिस्टरची परीक्षा पसार झालों व या आगबोटीनें येणार ह्मणून त्यास पत्र पाठवून कळविलेंही होतें. तें पत्र त्याला कदाचित् पोहोंचले नसेल असें तर नसेलना ? एरवीं तो आल्याशिवाय राहिला नसता. माझ्यावर त्याचे कितीतरी उपकार झाले ह्मणून सांगूं ! हुंडा घेऊन माझ्या इच्छेविरुद्ध माझें लग्न करण्याचा घरच्या माणसांनीं आग्रह चालविला होता व मी नाहीं नाहीं ह्मणत असतांनाहीं त्यांनीं लग्नाची तयारी केलीच. तेव्हां सर्व कटकटींतून सुटून जाण्यास दुसरा कांहीं उपाय न राहिल्यामुळें माझ्याजवळचे असलेले चार साडेचार हजार रुपये घेऊन विलायतेस गेलों. मनांत विचार केला कीं अगदीं काटकसरीनें राहिलों तर तेव-

ढ्यांत निभाव होईल. पण तेवढ्यानें काय काथ वळतो ! तेथल्या डियर् लिव्हिं-गनें व एक्झ्यामिनेशन्च्या हेवी फीझनें दोन वर्षांतच बहुतेक पैसा पार झाला ! 'दुरून डोंगर साजरे' या ह्मणीची सत्यता तेथें पूर्णपणें माझ्या अनुभवास आली ! जेव्हां फक्त चारपांचशें रुपये माझ्याजवळ शिल्लक राहिले तेव्हां माझ्या मनाची काय स्थिति झाली ती माझी मलाच ठाऊक ! मी तर अगदीं गर्भ-गळित होऊन गेलों ! एवढा खटाटोप करून विलायतेस गेलों—व आतां थोडक्यासाठीं हात हालवीत परत जावें लागणार—असें जेव्हां दिसूं लागलें, तेव्हां विचार केला कीं दादाजींना लिहून पहावं—व त्याप्रमाणें पत्र लिहिलेंही. पण छेः ! ते कससे मला दाद देतात ! माझ्या पत्राचें जबाबही पाठविला नाहीं. एक तर त्यांचा मूळ स्वभावच तसा. त्यांत त्यांनां न विचारतां ऐन लग्नाची तयारी चालली असतां मी निघून गेलों. शिवाय, मी ज्या दिवशीं निघालों त्या दिवशीं दादींचे दागिने नाहींसें झाले त्यामुळें माझ्यावर त्यांचा साहाजिक आलेला संशय—या सर्व गोष्टींमुळें आगींत तेल ओतल्यासारखें झालें ! असो ! परंतु त्या विश्वासरावानें मात्र ऐन आणीबाणीच्या प्रसंगीं मदत केली खरी ! त्याला सर्व हकिगत कळाविली त्यासरसे त्यानें दोन हजार रुपये पाठविले ! जर त्यानें ते पैसे पाठविले नसते तर माझी धडगत नव्हती ! न इकडे न तिकडे असें झालें असतें. बॅरिस्टर झाल्याशिवाय जर यावें लागलें असतें तर मग लोकांत तोंड दाखविण्यास जागा राहिली नसती ! पण झालें तें टीक झालें ! ऑलस् वेल् धाट एंडस् वेल् ! गेल्यासारखी विलायतही पाहिली व बॅरिस्टरही झालों ! आतां दादाजींची कशी तरी समजूत केली पाहिजे. पण राहून राहून मला त्या दागिन्यांविषयीं मोठा अचंबा वाटतो ! सर्व मंडळीचा तर माझ्यावरच संशय ! विश्वासरावाला जरी मीं अगदीं स्पष्टपणें लिहिलें कीं मी दागिन्यांस कसा तो शिवलों नाहीं तरी त्याची कांहीं खात्री होत नाहीं. पैसे पाठवितांनाच त्यानें लिहिलें, 'दागिने घेऊन गेलास त्यांचें काय केलेंस?' हा मात्र व्यर्थ कलंक लागला खरा ! असो ! पण आतां येथें किती वेळ तरी वाट पहावयाची ! निःसंशय विश्वासरावास पत्र पोहोंचलें नाहीं ! नाहीं तर तो आल्याशिवाय रहाता ना ! व तो आला असता तर ठीक झालें असतें ! तो बरोबर असता तर दादाजींची समजूत लवकरच व थोड्या आयासानें करतां आली असती ! पण काय करायचं ! चला जावं एकटंच ! दादाजी बोलतील

तेवढं मुकाट्यानें ऐकून घ्यावं. देतील–दोन चार शिव्या देतील ! आणखी बसतील गप्प ! चला. मला तर दादीला केव्हां पाहीन असं झालं आहे–चला—

---

## प्रवेश ८ वा

[ **स्थळ**—खंडेरावाचें घर. ]

( सोनाबाई देवखोलींतून पूजा आटपून जात असतां– )

**बे०**—( मर्यादेनें व हळूच ) आज कज्जा निघायचा होता ना ?

**सो०**—( डोळ्यांस आंठ्या घालून ) हो, मगशी ?

**बे०**—कांहीं नाहीं. कांहीं सांगावयासारखं कळलं कीं काय ह्मणून मी विचारावयास आलें होतें.

**सो०**—( रागानें ) का? तुला का पंचाईत पडलय? आमी त्याचे आईबाप पायजे ती चौकशी करूं. तुला त्यांन मन घालाला कोणी सांगितलय ? पोटच्चे गोळ्याची किंव आमालाच येणार ! तुमी किती झाल्या तरी परक्याच !

**बे०**—आपण पाहिजे तें बोलण्यास मुखत्यार आहांत. परंतु मलादेखील थोडीशी किंव येणं साहजिकच नाहीं का ?

**सो०**—हो ! हो ! हाय खबर कवडी मोठी किंव तुला हाय ती ! नवरा तुरंगान गेलय पण इचे अष्टांगी हाय का ? मारतय मजा !

**बे०**—( गरीबीनें ) मी काय अशी मजा मारीत आहे तरी !

**सो०**—( रागानें ) बस ! बस ! मोठी शाणी झालयस ! हाय खबर. तुज शाणपण तुजेच्च जवळ ठेव.

**बे०**—मी कोठें शहाणी आहे. मी आपली वेडीच !

**सो०**—वेडी कशाची हायस ! वेड लावशील दुसऱ्यांना. ( रागानें ) तोंडी लागाला शरम नाय वाटे !

**बे०**—( लीनतेनें ) असं काय बरं बोलायचं—

**सो०**—आत चोमडे चाळे नको कराला ! बस गुपाचिप. पांढरेपायाची कोठची ! तुजेच्च पायगुणाशी त्याचेवरती अवडा परसंग आला !

**वे०**—तसंही असेल. मी नाहीं कोठें ह्मणतें. तुह्मी जें जें म्हणाल तें मला निमूटपणें ऐकून घेतलं पाहिजे.

**सो०**—नाय ऐकून घेशील ते कणाला सांगशील ! मोठी पराकरमी बाय पडलीस न ! लगीन लागाचीं खोटी, बहिण न बापुस घालवली. नवऱ्याला तुरं-गान पाठवला ! न अजुन कणाकणाचे बळी घेशील कणाला खबर ! तरी ते बोलतते का ही सोकरी नको करूं ! पण माला भूल पडली न !

**बे०**—तुमच्या ह्मणण्याप्रमाणें कां होईना ! कशी तरी. पदरीं घेतलीत हाच माझ्या आईबापांवर उपकार !

**सो०**—हो ! हान खबर, तुजा बापुस न आयस ! मेले तंव होते कर्जाचे डोंगर माथ्यावरती ! अन्नुमदी गेले ! न हाय खबर तुजे आयसचा तोरा ! पण भल्लं झालं देव इकडचा इकडेच हाय ! अभिमानाच घर खालीच !

**बे०**—तुह्मी मला हवं तें बोला. मीं ते सगळं निमूटमणें ऐकून घेण्यास तयार आहे. पण तुह्मी माझ्या आईबापांस व्यर्थ कां असें बोलतां ? माझ्या बापास जरी डोईभर कर्ज होतं तरी त्यानें तुमच्याजवळ तर एक पैही मागितली नाहींना ?

**सो०**—हो ! हो ! अन आमचे जवळ मागितल असत ते मिळते पायपोस-(रागाने) पण काग, तुजी जीभ भारी लांब होत चालली ग ? माला नाय हो चालाच अस ! मी तुजे असे बोल कदीपण सोसाची नाय-समजलीस !

**बे०**—अहो पण मी असं बोललें तरी काय ? कां मला उगाच छळतां ?

**सो०**—तू नाय बोललीस ! तुजी जिभली बोलली-जिभली ! थांब ! टाकतय तिला चरचरा चिरून !

**बे०**—मी आपणांस कांहीं कमीजास्त बोललें असेंन तर माफ करा. हा मी तुमच्या समोर पदर पसरतें. (पदर पसरते.)

**सो०**—चल जा इकडशी. मेली निलाजरी कोठची ! अवड बरं तिला बोलतां येतें ! सासूला पायजे तस टाकून बोलाव न मगशी पदर पसरावा ! खरच ! तुजा मी छळ करतय का ? बर. बर. येवंदे त्यांना भायेरशी-सांगतय सगळं त्यांना. अन त्यांना अस पण सांगतय-तुमची सून तुमाला लाडकी अशेल ते ठेवा तिला-मी नाय घरान रावाची पाणी पिवाला—

**बे०**—पण तसं कशाला ? मींच आपली जातें. तुह्मांला नकोशी असल्यास माझं तुमच्या घरीं काय काम आहे ! मी माझा रस्ता करून टाकतें तसं केल्यानं तुमच्या मागली माझी कटकट नाहींशी होईल !

**सो०**—(रागानें) जा मेले–रस्ता कर–का वाट कर ! माला तुझी थोडीच परवा हाय ! अन गेलीस ते दुनया ओस नाय पडाची !

**बे०**—ठीक आहे तर ! तुमच्या मनासारखंच करते. ( हात जोडून ) पण बोलल्याचालल्याची माफ करा बरं— ( जाते. मागून सोनाबाई जाते. )

---

## प्रवेश ९ वा.

[ **स्थळ**—खंडेरावाचें घर. ]

( बेनाबाई मागीलदारांतल्या विहिरीजवळ उभी आहे )

**बे०**—देवा ! तुझ्या अवकृपेमुळें आजदिवसपर्यंत मी पुष्कळ दुःख भोगलें. परंतु आतां तें माझ्यानें नाहीं सहन करवत.

### पद

**दावि निवारा । मम जिवा तव पदीं । दीन दयाळा ॥ ध्रु० ॥**
**ना लाभे । जगतीं या ममता ।**
**मानिली पतित ही । देवा तव बाला ॥ १ ॥**

म्हणून मी जीव देण्याचा विचार करून येथें आलें आहें तर आतां त्यामध्यें विघ्न आणूं नकोस. या माझ्या आत्महत्त्येनें कोणासही विशेष दुःख होण्यासारखं नाहीं. बाबा तर दुःखांतून सुटले. कायती आई राहिली आहे. तिला मी असले नसले सारखीच. तिची वाळी घालविल्यापासून तिचं मन माझ्यावरून उडून गेलं आहे. सासुसासऱ्यांस तर हेंच पाहिजे आहे. दादीनीं तर सकाळीं साफ सांगितलं कीं माझी त्यांना परवा नाहीं व मी असं कांहीं केलं तर दुनियाही ओस पडणार नाहीं. ठीक आहे. मीं असं केल्यानें त्यांना तरी आनंद वाटो ! जर माझ्या पायगुणानें त्यांच्या घराची वाताहात झाली तर असले मेले पांढरे पाय मी त्यांच्या घरांत ठेवूं तरी कशाला ! असो, आतां वेळ करून उपयोग नाहीं. येथें कोणी नाहीं तितक्यांतच आपलं काम उरकून घ्यावं म्हणजे झालं ! देवा,

तुझ्याजवळ सरशेवटची माझी हीच विनंती आहे कीं त्यांची अब्रूमध्यें सुटका कर व त्यांनीं मजजवळ जो निश्चय केला होता त्याप्रमाणें वागण्याची त्यांना बुद्धि दे ! माझ्याच कपाळीं सुख भोगणं नव्हतं ह्मणून आजपर्यंत त्यांच्या बुद्धींत फरक झाला नाहीं ! व जरा कोठें होत होता तों हें विघ्न मध्यें आलं ! असो ! परमेश्वराचीच तशी मर्जी ! आपण त्याला काय करणार ! देवा, मी तर माझ्या दुःखाचा या रीतीनें शेवट करीत आहें. परंतु यापुढें त्यांच्यावर कोणत्याही रीतीचं दुःख पडूं देऊं नकोस ! हीच माझी तुझ्यापाशीं शेवटची विनंति आहे !

( आंत उडी टाकणार इतक्यांत— )

**शा०**—( धांवत धांवत येऊन ) अग, हें काय करतेस ? अग मी आलोंना ? माझ्याकडं बघ— ( बेनाबाईस हातानें बाजूस करितो. )

**बे०**—( शामरावाचा हात दूर करून ) चला तुह्मी–अडवूं नका मला–मला जाऊंद्या—

**शा०**—अग वेडी बिडी तर झाली नाहींसना ? हा मी तुझा शामराव–मी आतांच सुटून आलों !

**बे०**—( संशयानें ) खरंच ? काय, तुह्मी सुटून आलेत ? पण पुन्हा येतील ते तुह्मांला पकडायला ! तुह्मी त्यांच्यापासून पळून आले असाल. ( बाहेर आवाज होतो तो ऐकून ) ते पहा–ते आले ! पळा–पळा अहो पळा येथून–नाहींतर या माझ्याबरोबर–आपण दोघेंही आंत उडी घालूं– ( विहिरीवजळ जाऊं लागते. )

**शा०**—( तिला दूर करून ) तुझ्या मनाला भ्रम तर झाला नाहींना ? अग चल–आतां काय त्यांची बिशाद लागली आहे यावयाला ! अग ती सगळी चूक होती–चूक–

**बे०**—खरंच ? ( मोठ्यानें रडून व मिठी मारून ) तर मला टाकूं नका आतां. मला तुमच्याशिवाय दुसरं कोणी नाहीं हो !

**शा०**—वेडे तुला मी टाकीन ! अग, आतां मुकी रहा. अशी रडतेस का ? अशा आनंदाच्या वेळीं सुख मानण्याबद्दल असं रडायचं का ?

**बे०**—सुख ? मला सुख आतां पुढल्या जन्मीं—

**शा०**—छेः छेः आतां जोंपर्यंत माझ्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत तुला काडीएवढं दुःख देईन तर शपथ ! रात्रीं दिलेलें वचन विसरलीस वाटतं ?

**बे०**—घ्या पुन्हा शपथ !

**शा०**—हो ! ही घेतली शपथ—

**बे०**—माझ्या गळ्याची शपथ ?

**शा०**—अग वेडे-(तिच्या गळयावर हात ठेवून) तुझ्या गळ्याची शपथ-झालं ?

**बे०**—( मिठी मारून व किंकाळी फोडून ) देवा- ( बेशुद्ध होऊन पडते. )

**शा०**—अरेरे—ही तर बेशुद्ध झाली-कोण आहेरे तिकडे ? रामा—अरे—रामा- ( इतक्यांत खंडेराव, सोनाबाई इत्यादि मंडळी येतात.)

**खं०**—कारे शामराव, अरे तूं कदी आलास ? ( बेनाबाईस पाहून ) पण ही इकडे कोण पडलय ? अरे ही बेनी ! ( शामरावास ) कारे, तिला मारलीस बिरलीसका का ? हं ?

**शा०**—नाहीं हो. ही जरा घेरी येऊन पडली आहे.

**खं०**—(सोनाबाईस) अग ए अशी बगत काय उभी रायलयस खुट्यासारखी ? सावध कर तिला. ( बेनाबाईस सावध करितात. बेनाबाई सावध होऊन बाजूस उभी रहाते. )

**खं०**—कारे ! इकडे तुमी का करीत होतेत ?

**शा०**—कांहीं नाहीं दादाजी. मी सुटून आलों व वरती चढणार तों हिला विहिरीजवळ पाहिली. तसाच मी धांवत धांवत इकडे आलों. ही आंत उडी टाकणार इतक्यांत तिला बाजूस केली. नंतर कांहीं विचारपूस झाल्यावर ती घेरी येऊन पडली.

**खं०**—(आश्चर्यानें) का ? जीव देवाला आलती ? (बेनाबाईस) काग वेडे, तूं आपले जिवाला कां अवढी कंटाळलीस ?

**बे०**—( मर्यादेनें ) तें दादीबायनांच विचारायचं होतं.

**खं०**—( सोनाबाईस ) काग, तूं इला काय कमी जास्ती बोललीस वाटते ?

**सो०**—आ-नायबा. मी असं का बोललुं ? अन माला का खबर ही असं कराला जायल ह्मणूण. मी माजे तोंडाला खीळ घातलसती.

**खं०**—बरं ते असो. झाली गोष्ट परत येत नाय. आजचा दिवस मोठा आनंदाचा समजला पायजे ! एक ते शामराव अबरूमदी सुटून आला अन दुसर इची वेळेवर सुटका झाली ! जर का इला कोणी बगीतल नसत ते सगळ फसल असत.

शामराव, मला या विश्वासरावनीं सगळ सांगितलय, हे बग, झालं ते आतां पुष्कळ झालं. यापुढें तरी सांभाळून वागा—

**शा०**—तें मी सांगून काय उपयोग ! करून दाखवीन. विश्वासरावासारखा आपल्या कुटुंबाचें हित चिंतणारा खरा मित्र मला मिळाला हें मी माझं भाग्य समजतों. मी जो सुधारलों त्याचं श्रेय सगळं यालाच दिलं पाहिजे.

**वि०**—छेः छेः मला काय ह्मणून ? ( हंसून ) रंगूबाईला—

**शा०**—( तिरस्कारानें ) नको ! तिचं नांव नको आतां काढूं—

( इतक्यांत वामनराव व पुतळाबाई येतात )

**वा०**—दादाजी—मी तुमच्याजवळ क्षमा मागण्यासाठीं आलों आहें. ( पुतळाबाईकडे बोट करून ) हीचे म्हणणें ऐकून व हीच्या लबाड बोलण्यावर भरंवसा ठेवून मी अविचारानें तुमच्यापासून निराळा झालों. त्याबद्दल मला आतां पूर्ण पश्चाताप झाला आहे. तुह्मी जर आमच्या अपराधाची क्षमा न कराल तर मग आह्मी कोणाकडे पहावें—

**खं०**—अरे, आज हे मी का ऐकतय ! ( वामनरावास ) तुमाला माजी पूर्ण क्षमा हाय. निराळा संसार मांडन्यानं का फायदा हाय याचा अनुभव तुमाला लवकरच आला अस दिसते ! असो ! तुमीच्च आमाला ह्मातार्‍यांना सोडून गेलेत न तुमीच होऊन पुन्हा एकवट रावाला मागता तवं मी तरी कोठच्चे तोंडान नाय बोलूं, या—खुशाल या. हे घर तुमच्चच हाय.

**वि०**—( मनांत ) वा वेळीं धाकलाभाई असता तर काय मौज झाली असती बरं ! ह्मातार्‍याचा आनंद गगनांत मावला नसता ! ( उघड ) दादाजी, मी तुह्मांला सकाळीं काय सांगितलं ? तुमचे दुःखाचे दिवस सरत आले आहेत ह्मणून ना.

**खं**—हो बाबा. तुझे वाणीला देवान यश दिलं खर. पण विश्वासराव, यान एक गोष्ट कमती हाय. माजा धाकल्या असता तर काय मजा झालसती.

( रामा गडी येतो. )

**रामा०**—दादाजी—ओटीवरती एक किरिस्तांव आलय—तुमासनी विचारतय.

**खं०**—कोण किरिस्तांव ? जारे शामा, कोण आलय तो बग. ( आंत इंग्लिश ड्रेसमध्यें धाकलाभाई येतो. ) अरे हा ते इकडे आला. अरे ये किरिस्तावड्या, हे घर कोणाच्च हाय ? भायेर उभा रा. मदी कोठे चाललास ?

**धा०**—दादाजी–मला तुह्मी–

**खं० सो० वगैरे**—अरे हा धाकलाभाय ! (धाकलाभाई सोनाबाईस भेटतो)

**धा०**—तोच मी. दादाजी, मी तुमचेजवळ माफी मागण्यास योग्य नाहीं. परंतु येथून गेल्यावर माझी काय स्थिति झाली–मला किती हाल सोसावे लागले–व तुमच्या बरोबर कपटानें वर्तन केल्याबद्दल माझा जीव किती हळहळत आहे–हें तुह्मांस समजलें ह्मणजे तुह्मी देखील माझ्यावर दया केल्याशिवाय रहाणार नाहीं.

**खं०**—बस्स ( विश्वासरावास ) विश्वासराव, तुजं बोलणं अगदीं शबदान शबद खरं झालं रे ! ( धाकलाभाईस ) धाकलाभाय, तूं जरी आमचं पुष्कळ नुकसान केलयस तरी पण या वखताला तुला माज्यान नाय बोलवे नाय. मी मोठ पोट करून सगळ्यांचे अपराध पोटान घालतय. सकाळ भटाला बोलावून प्राय-च्चित घेऊन सुद्ध हो. पण कारे, नेलस त्याच्यांतल काय पण परत आणलयस का ?

**वि०**—(धाकल्याकडे पाहून हंसत ) जाऊंद्या दादाजी आतां. सलामत घरचें घरीं परत आला हेंच समाधान—

**खं०**—हो खरंच–( सोनाबाईस ) अग ए–त्या तुजे सुनाना तुजे पदरान घे–त्यांना पोटचे सोकऱ्यांसारख्या वागव–(पुतळाबाई व बेनाबाईस ) अन तुमी पण तिचे बरोबर नीट वागत जा. सासू हाय–दोन सबद बोलली तरी ती आपले बऱ्यासाठींच बोलतय–अस समजा. अन तुमी सगळे मिळून हें घर पुन्हा नांदत करा, बग विश्वासराव, घर कसं पुन्हा हंसाला लागल ते ?

**वि०**—त्यांत काय नवल ! अहो, मुलं बाळं ही एक घराची शोभाच आहे. ही सर्व संतति ईश्वरकृपेनें तुह्मांला मिळाली असताही कांहीं दैविक कोपानें त्रास भोगावा लागला !

**खं०**—अन विश्वासराव, देवाचा अवडा कोप होवाचं कारण पण माजे ध्यानांत आलय. ते लोकांच घेतलेल सोनं–ते नडलं. ते घरान होत तवं असे हालहवाल झालते. न ते एकदाच गेलं–त्याचे बराबर घरानच दुसरपण